

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका









चौथा संगीत विशेषांक

# दीपावली

वर्ष :२५ वे * जून १९६९ * मूल्य २ रु.

## श्रेयनामावली

**बुवांचा मुलगा.** पिसं कोंबड्याला असतात, सिंहाला नव्हे. **रवींद्र पिंगे ● जुग जुग बाट निहारू तोरी...** आणि अशी वाट पाहात असतानाच तो प्रसंग घडला. **भास्कर उत्तरवार ● स्वरसृष्टीचा सुस्वर... गो. शं. हुजूरबाजार ● चित्रपटातील संगीताचे स्थान** चित्रपटातील संगीताने कोणते परिणाम घडतात ? **अशोक रानडे ● सूर आणि नूर.** आत्ता येऊन गेले ते मिर्झा गालीब होते ? **मंगेश कुळकर्णी ● कथा ही चंद्र प्रवासाची** जिम लोवेलने सांगितलेली **प्रा. रा. वि. सोवनी ● हृदयाचे गाणे** बापूनी सर्वस्व घालवूनही स्वर मात्र कायम राखला **लुई फर्नाण्डिस ● पूरबके खलिफा.** मशहूर तबलानवाझांना श्रद्धांजली **अरविंद मुळगांवकर ● गीतासार.** ही सुहासिनीबाईंची साधना **सौ. ज्योति सोमण ● 'दीपावली' विशेषांकांचे विशेष दालन.** रजत महोत्सवातील खास लेख **प्र. श्री. नेरूरकर ● संगीत सुसंवाद** कृष्णराव चोणकर, श्रीपादराव नेवरेकर, राम मराठे, रामदास कामत यांचे विचार

कविता : **शरद मंत्री ● पद्मा लोकूर** आणि **सह्यदय** यांचे **सामगायन** आणि दीपमाला. .इंद्रधनुष्य. .पानपुरी... सन्मानपुष्पे इत्यादि नेहेमीची सदरे

आणि

### * राजकारणातील सूर, आसूर, बंदसूर, भेसूर, कणसूर *

**मासिक विंगचित्रमाला**

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत २ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio 42, Kennedy Bridge, Bombay–4.








**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :

३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ **द्वैवार्षिक** वर्गणी रु. २५; **त्रैवार्षिक** वर्गणी रु. ३० **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. २०

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जवाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जवाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१,खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


# सुर असुरोंके बने न नाते

ही दुनिया सुरांची आहे. सुरांनी, सुरांसाठी निर्माण केलेल्या ह्या दुनियेत सुरांना शोभित करण्यासाठी मग ताल आले. सृष्टीने साधलेली लय आली. तानांच्या रूपाने येणारे–नैसर्गिक विकसन आले. सुरांना साथ देऊन, त्याच्या कडून काहीतरी संवाद साधण्यासाठी, दाद देण्या–मागण्यासाठी मग आले शब्द! त्या कोरड्या शब्दांना 'कळा' लाभणार नाही ह्या जाणीवेने त्या शब्दांना 'साथ' करण्यासाठी मग धावले 'भाव'! कधी शृंगाराची तर कधी व्यथेची, कधी विरहाची तर कधी आनंदाने नाचणाऱ्या मोराची गीते त्या भावातून स्रवू लागली. मग सूर नुसते सूर राहिले नाहीत. निसर्गातल्या साऱ्या शक्ति त्या सुरांच्या पाठीशी उभ्या राहिल्या. आणि त्यांनी आपापले सर्वस्व त्यांच्या पायाशी ओतून त्यांना विविध रूपे देण्याचा प्रयत्न केला. त्या रूपाचे झाले 'राग'–विविध चेहऱ्या-मोहऱ्याचे पण आत्मा मात्र एक असलेले ! सुर हे सुरच राहिले पाहिजेत. ते असुर होता कामा नयेत 'बेसूर' तर नाहीच नाही अशी अपेक्षा बाळगीत हे सारे साथीदार–ताल–लय-राग-शब्द–युगे युगे लोटली तरी प्रयत्नशील आहेत. कारण ही सुरांची दुनिया आहे ह्याची जाण त्यांना आहे. आणि सुरांच्या दुनियेचे रूप 'सुरूप' रहावे असे वाटत असेल तर सुरांचे इमान हे कायम राहिलेच पाहिजे–राखलेच पाहिजे ही जाण सुरांना आणि साथीदारांना आहेसे दिसते. असुरांचे आणि सुरांचे कधी जमले नाही. युगे लोटली तरी सुर आणि असुरांचे युद्ध चालूच आहे. सृष्टी बेसूर, बदसूर, बेताल, बेलय करण्याचा प्रयत्न असुर सतत करीतच आले आहेत. युगायुगातून त्यांची नावे फार तर बदलली असतील, पण सृष्टीचा तोल आणि ताल ढळविण्यासाठी ते सतत प्रयत्नशील राहिले आहेत. आणि तरीही सुरांचा पराभव करणे त्यांना जमले नाही. कारण सुर हे 'सत्य' आहे. सुर हे 'सृजन' आहे. सुर हे 'आनंद घन' आहे. सुर ही 'प्रकृति' आहे. सुर ' हे आत्मतत्व' आहे. सुर आहेत म्हणून सृष्टि आहे. सुर आहेत म्हणून संरक्षण आहे आणि सुर आहेत म्हणून मधुनमधुन असुरशक्तींनी बिघडविलेला सष्टीचा तोल सतत सावरला गेला आहे. सुर आहेत म्हणून भावांना अमरत्व आलेले आहे. सुरांच्या ह्या दुनियेत आम्ही 'क्षेम' आहोत. 'क्षेम' राहू शकतो आहोत. अंगाईपासून अंत्यविधीपर्यंत हे नाते तुटत नाही. कारण सुर हेच अंतिम सत्य आहे. श्रद्धा घेऊनच माणसाचे मन आणि कान जन्म पावत असतात.

कलेचा शोध म्हणजे सृष्टीच्या आदितत्वांचा शोध असतो. चित्र, रंग, शब्द, सुर आदि माध्यमातूनच माणूस त्या आदि तत्वापर्यंत पोहचणार असतो ही श्रद्धा 'दीपावली' मानीत आलेली असल्याने चित्र-रंगाच्या माध्यमाप्रमाणेच सुरांची साधना करणारा 'संगीत विशेषांक' काढण्याची पद्धत दीपावलीने चार वर्षापूर्वी सुरू केली. त्यावेळी तो एक 'प्रयोग' होता. अंधुक आकृती तेव्हा बोलावीत होत्या. 'वस्तु वस्तुषु' असे उत्तर मिळत होते. म्हणून सुरा सुरातले सौंदर्य विविध माध्यमातून शोधण्याचा प्रयत्न 'संगीत अंकाचे निमित्ताने आम्ही करीत आलो आहोत. तीन वर्षे ह्या कल्पनेला रसिकजनांचा सुरेख प्रतिसाद मिळाला. लेखकांचाही प्रतिसाद चांगला लाभला. कथा अंक, सैन्य दले विशेषांक 'अर्जुन' विशेषांक, वर्षारंभ (विनोद) अंक, एव्हरेस्ट गौरव अंक, आदि विशेषांकाप्रमाणेच 'संगीत विशेषांक' स्थिरावला आहे असे आम्हास वाटते. कारण 'सुर' ही प्रकृति आहे. 'असुर' ही विकृति आहे. आपण सारी सुरगणाची (देवगणाची) माणसे आहोत अशी आमची श्रद्धा आहे. त्या श्रद्धेचा 'विसार' म्हणजेच हा संगीत विशेषांक ! !

मैफलीत या ! तंबोरे मस्त जुळून राहिले आहेत.

—संपादक

# समर्पित जीवनाची समाप्ती



'साधी राहणी आणि उच्च विचारसरणी'या सुभाषिताचा मूर्तिमंत आविष्कार म्हणजे भारताचे राष्ट्रपती डॉ. झाकीर हुसेन हे होत. व्यवसायाने ते शिक्षक होते, उच्च विद्याविभूषित असे शिक्षक होते आणि शिक्षकाच्या पेशाला अत्यंत आवश्यक अशी विनम्र वृत्ती, पूर्ण विचारान्ती घेतलेल्या निर्णयांच्या बाबतीत ताठर भूमिका स्वीकारण्याची वृत्ती, एखादी जबाबदारी पत्करल्यावर ती पार पाडण्यासाठी आवश्यक असणारी जिद्द, स्वतंत्र प्रज्ञा इत्यादी अनेक गुणांमुळे त्यांनी मिळविलेले थोर पद कृतार्थ ठरले होते. भारताचे पहिले राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद आणि दुसरे राष्ट्रपती डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांनी निर्माण केलेल्या थोर परंपरांमध्ये तिसरे राष्ट्रपती डॉ. झाकीर हुसेन हे चपखलपणे बसले. डॉ. राजेंद्रप्रसाद हे साधुवृत्तीचे विद्वान तर डॉ. राधाकृष्णन हे थोर तत्त्वज्ञ होते. या दोघांचे हे विशिष्ट गुण डॉ. झाकीर हुसेन यांजमध्ये एकत्रित पाहण्यास सापडत होते. असे हे भारताचे उच्चस्थानविभूषित थोर नेते गेल्या दि. ३ मे रोजी हृदयविकाराच्या झटक्याने अचानकपणे कालवश झाले. त्यामुळे उभा भारत देश दुःखाने हळहळला.

डॉ. झाकीर हुसेन हे मूळचे एका आफ्रिडी घराण्यातले. त्यांचे पूर्वज फरुखाबाद जिल्ह्यात येऊन स्थायिक झाले. तेथेच डॉ. झाकीर हुसेन यांचा १८९७ साली जन्म झाला. त्यांच्या लहान वयातच त्यांचे वडील निधन पावले. पण अत्यंत जिद्दीने आपले शिक्षण पुढे चालू ठेवून ते महॉमेडन अँग्लो-ओरिएंटल महाविद्यालयातून (आताचे अलिगढ मुस्लीम विद्यापीठ) पदवी परीक्षा देऊन उत्तीर्ण झाले आणि तेथेच त्यांनी पदव्युत्तर शिक्षणक्रम चालू ठेवला. ते कायद्याचाही अभ्यास करीत होते. त्याच सुमाराला म्हणजे १९२० मध्ये देशाच्या स्वातंत्र्यासाठी म. गांधींच्या नेतृत्वाखाली चळवळ सुरू झाली होती. त्यावेळच्या आपल्या प्रचार दौऱ्यात गांधीजींनी अलिगढ विद्यापीठालाही भेट दिली होती आणि विद्यार्थ्यांना शाळा-कॉलेजांवर बहिष्कार घालून मायभूमीच्या स्वातंत्र्याच्या चळवळीत उडी घेतली पाहिजे असे जोरदार आणि निकडीचे आवाहन केले होते. त्याचाच परिणाम होऊन डॉ. झाकीर हुसेन यांनी आपल्या काही सहकाऱ्यांसह शिक्षण सोडून दिले आणि ते चळवळीत सामील झाले. या चळवळीतही त्यांचा विधायक कार्यावरच विशेष भर होता आणि म्हणूनच त्यांनी जामिया मिलीया इस्लामियाची (राष्ट्रीय मुस्लिम विद्यापीठ) स्थापना केली आणि तेथे राष्ट्रीय शिक्षण प्रदानाला प्रारंभ केला. दोन वर्षेपर्यंत अत्यंत अल्प वेतनावर काम करून विद्यापीठाची घडी नीट बसविल्यावर ते अधिक उच्च शिक्षणासाठी जर्मनीला गले आणि बर्लिनमध्ये अर्थशास्त्राचा सखोल अभ्यास करून त्यावरील संशोधनात्मक प्रबंध बर्लिन विद्यापीठाला सादर केला. बर्लिन विद्यापीठाने तो प्रबंध स्वीकारून झाकीर हुसेन यांना पीएच. डी.ची पदवी बहाल केली. तेव्हापासून ते डॉ. झाकीर हुसेन या नावानेच सर्वत्र ओळखले जाऊ लागले. डॉ. झाकीर हुसेन यांच्या गैरहजेरीत त्यांनी स्थापन केलेल्या राष्ट्रीय शिक्षण संस्थेची घडी विस्कटली आणि संस्था आर्थिक टंचाईच्या भोवऱ्यात सापडली. पण डॉ. झाकीर हुसेन यांनी म. गांधींना त्या प्रकरणी लक्ष घालण्याची विनंती केली. गांधीजींनी संस्थेला आर्थिक साहाय्य मिळवून दिले आणि संस्था जगविली; मात्र अलिगढहून तिचे स्थलांतर घडवून आणून ती दिल्लीत आणावी लागली. डॉ. झाकीर हुसेन यांनी मायदेशी परतल्याबरोबर त्या संस्थेची सूत्रे हातात घेतली आणि संस्थेची सेवा करता यावी म्हणून त्यागी जीवन स्वीकारले. जामिया मिलिया इस्लामियाचे ते अगदी तरुण वयातच कुलगुरू झाले आणि तब्बल बावीस वर्षेपर्यंत अत्यंत कमी वेतनावर त्यांनी शिक्षणप्रदानाचे कार्य केले. स्वतः कष्टमय जिवन पतकरून इतरांच्या बुद्धिमत्तेला वळण पाडण्याचे कार्य त्यांनी अव्याहत केले. हेच त्यांचे समर्पित जीवन होय. सबंध देश हे आपले घर आहे असे ते मानीत असत. "सबंध भारत हे माझे घर आहे आणि भारताचे नागरिक हे माझे कुटुंबीय आहेत. हे घर सुरम्य व्हावे आणि त्याबरोबर एखाद्या किल्ल्यासारखे मजबूत व्हावे यासाठी मी जन्मभर झटत राहीन" असे ते नेहेमी म्हणत. हे त्यांचे ध्येय वाक्य आचरण्यात उतरविण्यासाठी ते सतत प्रयत्नशील होते.

भारताने स्वातंत्र्य मिळविले ते फाळणीची भयानक किंमत देऊनच. त्या काळात अलिगढ मुस्लिम विद्यापीठ म्हणजे एक 'संशयभूमी' झाले होते. या विद्यापीठाची सूत्रे धर्मांध व्यक्तींकडून काढून घेऊन त्यावेळचे केंद्रीय शिक्षणमंत्री मौलाना अबुल कलाम आझाद यांनी त्या जागेवर डॉ. झाकीर हुसेन यांची योजना केली. डॉ. झाकीर

(पृष्ठ ५४ वर)






# बुवांचा मुलगा

—रवींद्र पिंगे



बुवांबद्दल लिहावं तेवढं थोडंच होईल. मुळात हा पुऱ्या मापानं मराठी माणूस. म्हणजे मुंबई, पुणे, कोल्हापूर हा त्रिकोण तुडवला आणि वर्षाकाठी एकदा वऱ्हाडात चक्कर टाकून झाली की त्याने कृतार्थ व्हायचं. पण ग्वाल्हेरी गायकी नावाच्या अप्सरेनं त्यांच्यावर मंत्र टाकला. तेव्हापासून बवांची नजर नर्मदेच्या तीरांपलीकडे लागलेली असे. कारवार ते कलकत्ता, आणि गदग ते ग्वाल्हेरापर्यंत त्यांचा डिंडीम वाजला तो उशीरा. त्याअगोदर वऱ्हाणपुरापासून बनारसपर्यंत जिथे मिळाली तिथे सामवेदाची चार अक्षरे त्यांनी डोळे फाडफाडून गिरवली. घट्ट केली. बुवा जबरदस्त होते. अवलीये होते. मनस्वी होते. त्यांचं शरीर जसं गोटीबंद होतं, तसं त्यांचं गाणं भक्कम होतं. स्वर पीळदार होता. मोराच्या पिसाऱ्यासारखं त्यांचं गाणं फुलायचं. बुवांच्या गाण्याने स्वतःचाच असा एक घाट घेतलेला होता. लाटांसारखे ते तानांचे पंजे मारीत. शाळूवरची पाखरं कळपाने पळावीत तशी शब्दांची भरधाव फेक करीत. गानविद्येत बुवांना मांत्रिकाचा मान होता. एका अर्थी ते मांत्रिक होतेच. मी-मी म्हणणाऱ्यांवरसुद्धा बुवांनी मंत्र टाकला. घरंदाज गायकी हाच त्याचा अमोघ मंत्र. तो त्यांनी चौफेर टाकला. जे ज्ञाते होते ते मांत्रिकाच्या नादी लागले; भजनी लागले. जे ज्ञाते नव्हते ते त्या मंत्रोच्चारातील चैतन्यतत्त्वाच्या स्पर्शाने वेलीवरल्या फुलांसारखे थरारले. बुवांचा श्रोता म्हटला म्हणजे तो बुवांच्या गाण्यापुढे तळ्यातल्या कमळासारखा जागच्या जागी खिळून राहायचा. साहजिकच, अशा जबरदस्त बुवांच्या भोवती ढगांसारख्या आख्यायिका जमल्या. त्यातल्या काही खऱ्या, काही फोल असतील. एक गोष्ट मात्र शंभर हिश्श्यांनी सत्य आहे : बुवा अलौकिक होते.

अशा अफलातून बुवांचा आज फक्त एकच फोटो उपलब्ध आहे. ते ठिकही आहे. चंद्रसूर्याची आपल्याला किती रूपं माहित आहेत ? पण प्रतिक्षणी नित्य नूतन सौंदर्य प्रगट करण्याचं त्यांचं सामर्थ्य आपण जाणतोच. तेव्हा बुवांना चंद्रसूर्याची सोबत आहे हेही रीतसरच झालं. त्या एकुलत्या एका फोटोत बुवांनी आपला डावा डोळा किंचित् किलकिला केला आहे. कदाचित त्यांनी तो तसा करूनही दाखवला असेल. आता जरा अधिक निरखून पहा. घाऱ्या नजरेचे बुढ्ढे बुवा पक्के बेरके दिसायला लागतील. होय. बुवा बेरकेही होते आणि जोडीस जोड म्हणून मुरब्बीही होते. ग्वाल्हेरी गायकीची रवडी पचवून पचवून त्यांना माज आला होता. त्यामुळे बुवांचा राबता समान दर्जाच्या धुरंधरांबरोबरच असे. वरिष्ठ असं त्यांनी कधी कुणाला लेखलं नाही. कनिष्ठांबरोबर खांदेघसटही केली नाही. अवसानानं त्यांनी हात घातला तो एकदम बेटगिरी संस्थानाच्या निळोमहाराजांच्या भगव्या फेट्यालाच ! बेटगिरी संस्थान टिचभर. पण निळोराजा होता कलेचा भोक्ता. कलावंतांचा कैवारी. कलावंतांचा लाल. आग्रेवाले खांसाहेब शफूरखांसाहेबांना त्यांनी राजाश्रय बहाल केला होता. एका हाताने तानपुरा आणि दुसऱ्या हाताने कान पकडून खुद्द बेटगिरीकर राजपुत्रच









अनुक्रमणिका

खांसाहेबांसमोर रियाजाला बसायचा, ह्यावरून खांसाहेबांची राजदरबारी चलती किती तेजीत होती ह्याची कल्पना येईल. त्या निळोमहाराजाला बबांनी स्पष्ट शब्दात सुनावलं,

"राजा, तुझ्या दरबारात कोण गातं ? गवई की बकरं ?"

"गवई !"

"त्याला कां ठेवलंय नोकरीत ?"

"गाणं येतं म्हणून."

"मग मला गाणं येतं म्हणून मी सांगतो–त्याला तावडतोब हाकून लाव !"

"कां रे ब्राह्मणा ?"

"कारण गाणं कशाशी खातात तेसुद्धा त्याला माहीत नाही. असलं बेअक्कल मेंढरू इथं दरबारात पोसण्यापेक्षा मण दोन मण कांदेबटाटे दे पाठवून त्याच्या खेड्यावर. म्हणजे तें तिथंच चरत बसेल. सालं नाव गाण्याचं नि कसब खाण्याचं–"

ही स्पष्टोक्ती ऐकून ती फेटेधारी काळी कांब लाल झाली. कुर्ऱ्यातच महाराजानी बुवांना ऐकवलं,

"अस्सा मोठा पंडित आहेस तूं तर सरळ सरळ खांसाहेबानाच भेट नि सांग की गाणं शिका माझ्याजवळ म्हणून. नि त्याउप्पर तुझी पीसं शिल्लक उरलीच तर भेटीला ये माझ्या. कळलं ?"

बुवा डावा डोळा कलता करून म्हणाले,

"राजा, पीसं कोंबड्याला असतात. सिंहाला नव्हे. जसा तू इथला राजा, तसा मी गाण्यातला राजा ! राजा राजाशी बोलतो. म्हणून तुला सांगितलं. तुझ्या नोकराशी मी बोलू शकत नाही. कारण तुझ्यासारखाच गाणाऱ्यांचा राजाही "आपली पायरी सांभाळतो !"

नाण्याचा हा असला आवाज बेटगिरी-नृपतिने प्रथमच ऐकला–आणि ऐकूनही घेतला.

फोटोत बुवा फार रुबाबदार दिसतात. पेन्शन घेतलेल्या टणक फौजदारासारखे वाटतात. बुवांचे गाल गुबगुबीत आहेत. मिशा छप्परदार आहेत. अंगात मलमलचं मुंडेछाट खमीस आहे. त्यावर काळचा उभ्या पट्ट्यांचा गरम लोकरी कोट आहे. आभाळाला वीज डंसावी तसं गळ्याला चिकटलेलं आखूड पीळदार जानवं आहे. उंच दिवालीची तिरकस टोपी आहे. चांगली मखमलीची आहे. आणि कोळणीच्या अंबाड्यात झेंडूचं फूल असावं तसा तिच्यावर फाकडू गोंडाही आहे. शहाळ्यात पाणी असावं तसं बुवांच्या गळ्यात गाणं आहे. आणि दूरवरच्या डोंगरमाळीवर चांदण्याची स्वच्छ साय धरावी त्याप्रमाणे बुवांच्या एकूण चर्येवर रूबाब पसरला आहे. पण तो आता ह्या उतारवयात. साठी ओलांडल्यानंतर. एक काळ बुवांनी असा पाहिला आहे की जेव्हा त्यांना चहा-बिस्कुट मिळताना वांदे होते. दत्तीबाईला तर त्यांनी सांगितलंच होतं,

"समजलीस चेडवां, गाणं आता स्वस्त झालंय. मालीगौरा रागाची ही बंदिश तुला तीन हप्त्यात हातावर पडली. पण तीच मला मिळवायला निस्सार हुसेन खांसाहेबांकडे बारा वर्षं हाडं फोडावी लागली; खांसाहेबांच्या सागुती-परोठ्याच्या पराती घासाव्या लागल्या !"

काही भाग्यवंतांना धनराशी आपोआप चालून आल्यासारख्या मिळतात. काहींना उन्हातान्हात खडक फोडून लक्ष्मीचा प्रवाह शोधावा लागतो. बुवांचं तसंच झालं. 'सैपाकणीचं पोर' ही त्यांची बाळपणाची पदवी. तिचा पदर झुगारून, 'गाणारा पोर' ही नवी उपाधी त्यांना चिटकली; किंवा त्यांनी चिकटवून घेतली. ना आग्या, ना पिच्छा अशा अवस्थेत त्यांनी मेळ्यात केंसटचा वाढवून बाजाच्या पेटीप्रमाणे गायचं, हे चाकोरीप्रमाणे झालं असतं. बुवांकडून नेमकं तेच झालं नाही. मांडवीच्या तीरावर छबिन्याची वाट बघत बसले असताना बुवांनी दिनानाथाला सांगितलं होतं,

"लेका, मंगेशाच्या समया अर्ध्या ढवच्या भावात घासणारा पोर तू. देवाने सेवा मानली नि गंधर्व कंपनीची पालखी तुझ्या दारात पाठवली. लोकांना आज मास्टर दिनानाथाचा आवाज दिसतोय. पण तू मनोभावे सेवा केलीस ते कुठे कळतंय? बाबा, सेवेचंच महात्म्य आहे रे, सेवेचंच महात्म्य आहे. भूगंधर्व रहिमतखांचा साधा आवाज कानावर पडावा म्हणून मी छल्यांच्या सर्कशीत हत्तींची लीद उचलल्याय. अगोदर जनावरांची सेवा केली. मालक खूष झाले. मग मालकांची सेवा केली. रहिमतखांसाहेब खूष झाले. मग खांसाहेबांची पिकदाणी घुतली, चिलीम भरली, थुंकी झेलली. मग गायनकला खूष झाली. आणि आज गवई झालो–साधा नव्हे, घराणेवाला–म्हणून तुझा कान धरू शकतो !"

बुवांच्या नांवाचा उल्लेख झाला आणि मास्टर दिनानाथाने कान पकडला नाही असं कधी घडलंच नाही.

आग्रा घराण्याचे खलिफा नथ्थनखां बुवांना भर बैठकीत म्हणाले, "बेटा, तुझा दिव्य स्वर इतक्या उंचीला भिडतोय की तितक्या उंचीवर माझी नजरसुद्धा पोहोचत नाही !" ह्यातली अतिशयोक्ती वजा केली तरी एका वनराजाने दुसऱ्या वनराजाला नीट ओळखलं, इतकं सत्य उरतंच. मान्यतेचे असे कैक बिल्ले बुवांच्या व्यक्तिमत्वावर लटकलेले होते. पण हा पल्ला गाठण्यापूर्वी बुवांनी केव्हढा फत्तर फोडला होता ! बंदेअलीखां, तानरसखां, महंमद अलीखां कोठीवाले, इनायत हुसेन लखनौवाले, बाळकृष्ण बुवा इचलकरंजीकर ह्या साऱ्या भीष्मांची विद्या त्यांनी आदरणीय मानली.

**....मंडप पूर्ण भरून गेला होता....बुवा तानपुरा घेऊन स्वरभरणा करू लागले....शुद्धकल्याण, मालकंस, सुरदासी मल्हार—सारं स्वरब्रह्म बैठकीत हात जोडून उभं राहिलं, ताना–बोलतानांच्या लाटा उसळल्या....**

तिचे आकंठपान केले. लंगोटी, तर लंगोटीच लावून राहिले. वाढलेल्या वयातही वर्षोन्-वर्षं माधुकरी मागितली. उन, वारा, दंव, थंडी, पाऊस, पाणी, काहीहि पाहिलं नाही. फक्त खलीफा लोकांचं गाणं ऐकलं, चर्चा ऐकल्या, त्यांच्या चिलीमी भरुन दिल्या, गुडगडीचे निखारे पेटवले. एकटक केलेली गुरुजनांची सेवा रुजू झाली. पदरात दोन गोष्टी पडल्या. गुरुमुखातली घरंदाज गायकी आणि परिचितांची कुचेष्टा. पैकी प्राणांची ओंजळ करून घरंदाज गायकीचं अमृत तेवढं प्रसाद म्हणून जवळ केलं. कुचेष्टेच्या पत्रा-वळी वाऱ्यावर सोडून दिल्या.

अफलातून गुरुजनांच्या आशीर्वादाचा प्रसाद आणि घरंदाज गायकीचा दिवा घेऊन बुवांची पदयात्रा सुरू झाली. झांशीला एका ब्राम्हणकन्येशी त्यांनी लग्न केलं. जवळ तोळाभर सोनं नव्हतं. सोन्याच्या मापट्यानेही मापता येणार नाही असा अनवट अस्ताई अंतऱ्यांचा खजिना होता. त्याच्या वळावर कुठे ना कुठे पोट भरता आलं असतं. नोकरी मिळाली असती. तशी संधीही चालून आली. एका मुसलमान जहा-गिरीत गायकाची गादी रिकामी होती. पण बुवा अर्ज करीनात. खुद्द सादिकअल्लीनीहि शिफारस केली. पण बुवांनी मुस्लीम जहा-गिरीची दिशा वर्ज्य मानली. त्याचं कारण सांगताना बावलीबाईला त्यांनी सांगितलं,

"विद्या ही परमपूज्य. तिच्या प्राप्ती-साठी मी यवनांचीही शागिर्दी केली. निस्सार हुसेनखांचा, उस्ताद सादिकअल्लींचा गंडा बांधला. गुरूसेवेत अभक्ष्याचीहि तयारी केली. तिथे माझा धर्म आडवा येऊ दिला नाही. कारण विद्या ही धर्मापेक्षा श्रेष्ठ आहे. मुक्ति ही काय चीज आहे त्याची धर्म कल्पना देतो. तर, विद्या साक्षात् मुक्ति देते. सा विद्या या विमुक्तये ! ह्या उलट पोट भरणं ही फार मामुली गोष्ट आहे. दोन माणसांना दोन वेळ जेवायला मिळावं म्हणून मी धर्माचा बळी देणार नाही. यवना-कडे नोकरी करणार नाही. त्यांचं अन्न खाणार नाही. माझा विचार ऐकून सादिक-अल्ली भडकले. म्हणाले "जशी ज्याची समज !" मी त्यांचा कोप ओढवून घेतला पण धर्माशी प्रतारणा केली नाही."

"मुसलमान नवाब मसणात गेले. पुन हिंदू राजें जिते अशील्ले मुं ?"

त्यावर बुवा उत्तरले,

"छट् गो ! राजा हिंदू झाला तरी तो ब्रिटीशाचा मांडलीकच. मांडलीकाचा मांड-लीक होवून विटंबना कशासाठी करून घेऊ ? दोन वेळच्या जेवणासाठी? त्यापेक्षा देवळात गाणं म्हणून जगेन की ! आहे काय, नि नाही काय !"

मांडलीक नसलेला, भगव्या ध्वजाच्या सावलीत राज्य सांभाळणारा, स्वतंत्र राजा शोधीत शोधीत बुवा वाळवोध अर्धांगीला सोबत घेऊन, हिमालयाच्या छायेतल्या नेपाळात हजर झाले ! पंचावन्न पदव्यांची बिरुदावली मिरवणाऱ्या स्वतंत्र हिंदू राजा-समोर त्यांनी त्रिवेणी, बरारी, मांझ, रायसा कानडा, जैतश्री, चैती, चांदणीकेदार, भिन्न षड्ज, अशा एकाहून एक अनवट रागांतल्या बंदिषींचा खजिना उघडला. आलाप, स्वर-भरणा, सरगम, मींड, स्थाईताना, बोल-ताना, ह्यांचा चक्राकारी पट उलगडून दाख-वला. अशोकमल्ल, नागमल्ल, विष्णुधर्मो-त्तर, सोमराजदेव, ह्यांचे शास्त्रशुद्ध दाखले दिले. चौमुखी घराणेदार गायकीची मिरास मांडली. राजाचं भान हरपलं. स्वरसामर्थ्यानं प्रभावीत होऊन राजा म्हणाला,

"बुवा, आपकी क्या माँग है ?"

"ब्राम्हण माणूस मी. मी काय मागणार? नि माझ्या गरजा तरी काय ?"

"ब्राम्हणाने दान स्वीकारलंच पाहिजे. बोला, काय देऊ ?"

"महाराज, अगदी मनाच्या अंतः-कोपातल्या इच्छाच जर सांगायच्या, तर त्या दोन आहेत. स्वतंत्र हिंदु राज्यातच माझ्या मुलाचा जन्म व्हावा असं मला वाटतं. तेव्हा मला इथे पुत्रप्राप्ती होईपर्यंत राहाण्याची परवानगी असावी. ही झाली पहिली इच्छा. आजपर्यंत मी जी विविध अंगांची गायकी शिकलो, तिची पद्धतशीर टिपणं काढून ग्रंथरचनेची पूर्वतयारी इथल्या रहिवासात करावी, ही दुसरी इच्छा."

"पशुपतिनाथाच्या आशीर्वादानं बुवांच्या दोन्ही इच्छा सफल होतील. बुवांनी मन मानेल तितके दिवस आमच्या राज्यात रहावं."

बुवा कृतकृत्य झाले.

श्रीदेव पशुपतिनाथाच्या अंगाऱ्याला यश आलं. नेपाळात बुवांना गुटगुटीत मुलगा झाला. त्याचं नांव त्यांनी 'शिवराम' ठेवलं. अस्ताई-अंतऱ्यांच्या वह्या तयार झाल्या. सर्व

राजकारणातला 'फुटका' सूर




स्वतंत्र तेलंगणाची मागणी जोरात सुरू आहे

अनुक्रमणिका





**Defence Ministry**

## MESSAGE

I am glad to learn that the "Dipavali" Magazine has brought out its May 1969 issue as "Air Force" special issue. Our Air Force has expanded rapidly to meet our Defence requirements and their performance at the time of agression by Pakistan was creditable. I send my best wishes for the occasion.

(SWARAN SINGH)

उपरोक्त संदेश 'दीपावली'च्या वायुसेनादल विशेषांकासाठी संरक्षण मंत्री ना. स्वर्णसिंगजी यांजकडून हाती आला तोपर्यंत सदर विशेषांक तयार झाला होता, त्यामुळे हा संदेश त्या विशेषांकात प्रसिद्ध होऊ शकला नाही यावद्दल आम्ही दिलगीर आहो

—संपादक

मनोवांच्छित परिपूर्ण झालं. नेपाळ सोडायचं ठरलं. देवासमोर बुवांनी एक भारदस्त जलसा केला. नेपाळात मिळवलेल्या धनापैकी फक्त प्रवासखर्च मागे टाकून उरलेली सर्व रक्कम बुवांनी देवाला दक्षिणा म्हणून दिली. राजाश्रयाबद्दलच्या कृतज्ञतेचं चिन्ह म्हणून नेपाळनृपतीच्या चरणी अस्ताईअंत्यांच्या वह्या ठेवल्या. राजाने त्या प्रसाद म्हणून परत केल्या; त्या घेतल्या. खाकेला तंबोरा मारला आणि बायको-मुलाला घेऊन बुवा दक्षिण दिग्विजयाला बाहेर पडले.

हिरव्या गार वनश्रीने आणि लाल मातीने विनटलेलं बेळगाव शहर ही बुवांनी आपली राजधानी केली. खुद्द बुवा राज. शिवराम हा युवराज. असा दरबार भरू लागला. तासन्तास रियाज सुरू झाला. बुवा पुढे गायला बसत. मागे साथीला तंबोऱ्यावर शिवराम बसे. जी अनवट गायकी आत्मसात करायला बुवांनी तीन तपं रक्त आटवलं ती शिवरामला बसल्या बसल्या मिळू लागली. रंग जमत गेला.

लोक म्हणू लागले, 'मुलगा बुवांच्या पुढे जाणार अशी लक्षणं दिसताहेत. अनवट रागांशिवाय स्वर लावीत नाही.'

बुवा म्हणत, 'पुढे जाणार नव्हे; गेला! हा पोरगा स्वतःची वेगळी गायकी स्थापणार!'

मुलगा पण नामी होता. म्हणे, "स्थापणार नव्हे; स्थापली!"

बुवा त्याला म्हणाले, "अरे हे भाकीत मी केव्हाच केलं होतं! एक तर तुझा जन्म स्वतंत्र हिंदु राज्यात विक्रमादित्यासारखा झालेला. तेव्हा तू झेंडा फडकवणारच. शिवाय तुझ्या बापाला मालवणच्या विठोबाआण्णा हडपांचा अनुग्रह आहे! ज्यांनी बाळकृष्ण बुवांच्या अगोदर ग्वाल्हेरी गायकीची कामधेनु महाराष्ट्रभूमीत आणली, त्यांत विठोबाआण्णा अग्रदूत. आईला कागलला सोडून विठोबाआण्णांच्या सेवेला मी मालवणला आलो तेव्हा मी केव्हढा होतो? अवघ्या आठ वर्षांचा. एवढं लेकरू बुवांची काय सेवा करणार? पण बुवांनी हिडीसफिडीस केलं नाही. तंबोरा धरण्यापासून शिकवलं. यमन, भूप, शंकरा, भीमपलास, असे सरळ राग घोटवून घेतले. सदैव प्रसन्न राहिले. जाताना तोंडभर आशीर्वाद दिला. काय टाप आहे लेका, तो फळल्याशिवाय राहील?"

असं ऐकलं की शिवरामाची छाती फुगून येई. मग पुन्हा बुवांना भरतं येई. अगदी खासगतीत सांगत,

"शिवा, अरे आपल्या घराण्यावर स्वामी विवेकानंदांचाही अनुग्रह आहे–टाळी दे!" मुलगा बापाला खुषीची टाळी द्यायचा. कळी खुललेला बाप तंबोऱ्यावरचा हात न काढता मुलाला खोल आवाजात सांगायचा, "कलकत्त्याला गेलो होतो. कुणी म्हणाले स्वामीजी गातातसुद्धा. म्हटलं, छाटीधारी साधू कसला कर्माचा गाणार! त्याला चाट करायला म्हणून बेलूरला गेलो–नि काय आश्चर्य सांगू शिवा, अस्ताला जाणाऱ्या सूर्याकडे पाहून श्री रागाचे पलटे घेणाऱ्या स्वामींचा स्वर ऐकून माझे पाय जागच्या जागी खिळले. सगळी दुनिया स्वामींना साधुपुरुष म्हणून ओळखते. मी त्यांना सगळ्या गवैय्यांचा बाप म्हणून ओळखतो! काय त्यांचे आलाप! काय त्यांचा धीमा स्वरभरणा! काय त्यांचा आत्मविश्वास! पंधरा मिनिटात स्वामींना कसोटी द्यायला म्हणून मी गेलो, तो पंधरा दिवस त्यांच्या चरणांपासून दूर झालो नाही! आख्ख्या हिंदुस्थानात कुणीही केलं नाही ते तुझ्या ह्या बापाने केलं–स्वामी विवेकानंदांकडून चिजांचे शब्द आणले! तू मोठा होशील तेव्हा तुला कळेल; स्वामींनी अनेकांना उपदेश दिला. अनेकांना सल्ला दिला. दिलासा दिला. तुझ्या बापाला–फक्त तुझ्या बापाला प्रसाद म्हणून चिजा दिल्या! नि त्या मी सहिनसही तुझ्या हवाली केल्या! सांग, सबंध हिंदुस्थानात आपल्या इतक्या धनराशी असलेले कुबेर कोण आहेत?"

शिवरामाचं मन मोहरून येई. अंग रोमांचित होई. देवाचा आशीर्वाद आणि दैवाचा अनुग्रह असलेल्या घराण्यात आपला जन्म झाला आहे, आपण इतरांपेक्षा लाखपटींनी श्रेष्ठ आहोत ह्याबद्दल तो निःशंक होता. शिकवण्यांच्या निमित्ताने बुवा गोव्यात तंबू ठोकायचे. बरोबर मुलगाही असायचा. बापासारखाच वेश करायचा. बापासारखाच ऐटीत बसायचा. बाप समोर असतानासुद्धा बावलीबाईसारखीला सुनवायचा,

"इनायत हुसेन लखनौवाले नि महंमदअली कोठीवाले भले मोठे उस्ताद असतील. पण आमचं उष्टं जेवलेले आहेत. अस्सल गायकी मुळात आमची. हिंदूंची. चारही वाण्या आमच्या. हिंदूंच्या. गौडार वानी तानसेनची. डागूर वानी व्रजचंद्राची. खण्डार वानी राजा समोखनसिंहाची. नौहार वानी श्रीचंद्र रजपूताची. त्यांच्या

(पृष्ठ ६५ वर पहा)







# ‘अधिकस्य अधिकं फलम्’ अशा या ‘अधिक’ महिन्यात अधिक दर्जेदार साहित्यानं नटलेला




## कथा विशेषांक

जुलै १९६९

किंमत दोन रुपये

ही झलकच त्याची साक्ष देईल :

| | |
|---|---|
| ☆ धूसर रेषा | शिल्प–चित्रातल्या त्या वक्र नि वाहत्या मीलन रेषा |
| ☆ चेटूक | ही मुखपृष्ठ गेलेली माणसं ... ही मुखपृष्ठ सजवलेली माणसं |
| ☆ राक्षसी असूया | मोटर सायकल उड्डाणात आडवं आलेलं कुत्रं |
| ☆ शब्द | रात्र रंगली, अनपेक्षितपणानं ... स्वर्गही बापुडवाणा दिसला |
| ☆ कान्ता वरयते वित्तम् | तिची निर्लज्ज व्यवहारी वृत्ती पाहून त्याला चीड आली होती |
| ☆ संकट सुंदरीला मदत | स्त्रीदाक्षिण्याचा अपेक्षित मोबदला शेवटी असा मिळाला |

आणि

**रजत-महोत्सवी वर्षातिल पहिली कादंबरिका**

शिवाय

‘दीपावली’ची नित्याची खुमासदार सदरे

तसेच

**★ मासिक बिंगचित्रमाला ★**

‘दीपावली’चे सर्व विशेषांक वार्षिक वर्गणीदारांना नेहेमीच्या वर्गणीतच मिळतात





अनुक्रमणिका



....आजतक पंडीत रामरंजनने आपको वहोत कुछ दिया!
वस्स, अव उसे वची हुं जिंदगीमे
केवल रामप्रसादही रहने दीजिये....
असं म्हणत ते फूटपाथवरील गर्दीत
केव्हाच मिसळून गेले

# जुग जुग बाट निहारू तोरी...

आज पंडीतजींचा एकावन्नावा वाढदिवस.

पंडीत रामरंजनच्या साधनेनं आकंठ भरलेल्या आयुष्याच्या पन्नासाव्या वर्षाचा शेवटला दिवस घेऊन मावळलेला कालचा सूर्य आज एकावन्नावा दिवस घेऊन उगवला होता.

ते आज जरा उशीराच उठले. आदल्या रात्रीपर्यंत उद्याच्या त्यांच्या वाढदिवसाच्या निमित्ताने आयोजित केलेल्या भरगच्च कार्यक्रमावद्दल चर्चा चालू होत्या. त्यांच्या अखिल हिंदुस्थानभर पसरलेल्या शिष्यांनी आणि चाहत्यांनी हा उत्सव येणाऱ्या कित्येक वर्षांपर्यंत स्मरणात राहील असा अभूतर्व घडवून आणण्याचा विडा उचलला होता. तशी जोरदार तयारीही चालू होती. सर्वत्र पसरलेल्या त्यांच्या गोतावळ्यापैकी अनेकजण कालच येऊन त्यांच्या चरणी रुजू झाले होते. काही आज येणार होते. अनेकांची अनेक दिवसात भेट नव्हती. विद्यादान करून त्यांना दिग्विजयाला पाठविल्यानंतर जरी पंडीतजींनी त्यांच्या संगीत क्षेत्रातील कामगिरीवर आवर्जून लक्ष ठेवले होते तरी त्यांची प्रत्यक्ष गाठ आज पडणार होती. आपणच लावलेल्या वेली-वृक्षांना आलेला वहर ते प्रत्यक्ष डोळ्यांनी आज पाहणार होते, ऐकणार होते.

ज्या सफलतेच्या परमोच्च क्षणांची ते आयुष्यभर वाट पहात होते तो आज उगवणार होता.

उठल्या उठल्या चूळ भरून ते समोरच्या खिडकीत गेले. सूर्यनारायण वावभर वर आला होता. कृतज्ञ अंतःकरणानं त्यांनी त्याला हात जोडून अभिवादन केलं. गेल्या पन्नास वर्षांच्या त्यांच्या साधनेला साक्षी असलेला तो आदित्यदेव त्यांना आज परमेश्वरासारखा वाटला. मनात भरून आलेल्या कृतज्ञतेला मूर्तस्वरूप देण्यासाठी आपल्या कमावलेल्या सुरात त्यांनी आदित्यस्तुती म्हणणे सुरू केले.

बाहेरच्या हॉलमध्ये त्यांचे काही शिष्य धीर गंभीर सुरात पंडीतजींची आवडती खुद्द वैजू वावरानं ध्रुपदात रचलेली शिवमत भैरवातली चीज आळवीत होते 'जयकाली कल्याणी . . .' संप्रदायाची चाकोरी मोडून नवीन गायनपद्धती रूढ करणाऱ्या पंडीतजींचा लोभ मात्र त्या प्राचीन ध्रुपदावरच होता. आपल्या शिष्यांनी दाखविलेल्या औचित्यानं त्यांचं मन भरून आलं. कोमल गांधार आणि कोमल निषाद कौशल्यानं वापरूनही एरवी वर्ज्य असलेला तीव्र धैवत गायनाचं सौंदर्य वाढावं म्हणून मधूनच पुसटता वापरणाऱ्या आपल्या शिष्यांचं त्यांना कौतुक वाटलं. तो त्यांनी सांगितल्यावरहुकूम येत होता. रागाचे सूर हवे तसे उमटत होते. बोट ठेवायला जागा नव्हती.

त्यांच्या चाहत्यांच्या दृष्टीनं आजच्या दिवसाचं महत्त्व फार मोठं होतं. हा केवळ एकावन्नावा वर्धापन दिन नव्हता. आज पंडीतजी स्वतः गाणार होते. गेल्या कित्येक वर्षांचं आपलं भर बैठकीत न गाण्याचं व्रत आपल्या चाहत्यांच्या आणि शिष्य वर्गाच्या आग्रहानं ते आज मोडणार होते. समाजाच्या साऱ्या थरातले लोक त्यांचं गाणं आज जिवाचा कान करून ऐकणार होते.

बाहेर आलापी वेग धरू लागली होती. दोन्ही निषाद आपापल्या सौंदर्यानं भक्तीच्या माळा ल्यालेला गंभीर रस निर्माण करीत होते. संध्याकाळी खच्चून भरलेल्या हॉलसमोर पंडीतजींच्या मौनव्रताची सांगता होण्यापूर्वी जणू त्याला शेवटचे अर्घ्य अर्पण करीत होते.

आज खूप गर्दी उसळेल. कार्यक्रमाचे संयोजक सांगत होते की किती गर्दी होईल ह्याचा नेम नाही. पंडीतजींचं दुर्मिळ गाणं ऐकायला साऱ्या देशातून कुठून कुठून लोक येत होते, येणार होते. सारखी चौकशी चालू होती. गेली अनेक वर्षे खणखणला नाही येवढा टेलीफोन गेल्या काही दिवसात खणखणून गेला होता.

गेल्या चाळीस वर्षांची कठीण साधना आज संध्याकाळी यशाचं भरघोस माप त्यांच्या पदरात ओतायला ओठंगून उभी होती. शतकांमधून असा संगीतकार झाला नाही ह्याची पावती देणार होती. संगीतात एक नवीन घराणे निर्माण करणाऱ्या महापुरुषाला अभिवादन करणार होती. एका यजमानाच्या दुर्गुणांनाही पोटापायी प्रशस्तीपत्र देणाऱ्या लाचार भिक्षुकाच्या मुलाला आज सारा भारतवर्ष अभिवादन करणार होता..

'केली प्रतीक्षा ह्याच क्षणाची' असं अंतःकरण भरून म्हणण्याचा हा दिवस.... एका दीर्घ कष्टमय जीवनाच्या अंधारी वाटचालीनंतर उगवलेला हा साफल्याचा दिवस....

बाहेर दुसऱ्या एका शिष्यानं सतारीवर गुर्जरी तोडी छेडायला प्रारंभ केला होता. बैजू बावऱ्यानंच निर्माण केलेला हा राग. राजा मानसिंहाच्या राणीच्या—गुर्जरीच्या—त्याच्यावरील भक्तीचं मोल म्हणून तिच्याच नावावर प्रचलित केलेला. केवढी रचना, केवढी तपस्या ह्या जुन्या लोकांची.

शिवमत भैरवानं अगोदरच गंभीर झालेल्या वातावरणात तोडीचे ते सूर आर्तता ओतू लागले. हळुहळू त्या सुरांची मंडलं पंडीतजींच्या आज सकाळी कृतज्ञतेनं मऊ झालेल्या अंतःकरणात झिरपून साठू लागली. सुरासुरांची शुद्धता आणि लगाव ह्यांचा क्षणोक्षणी वेध घेणारं त्यांचं पंडिती मन हळुहळू हरवू लागलं आणि उरू लागलं ते एक निरागस, साध्या सरळ माणसाचं मन. सुराच्या सौंदर्यानं मोहित होणारं, त्यांच्यातील आर्ततेनं कंपित होऊन हळुवार होणारं..

ती आर्तता सतारीच्या आलापीबरोबर वाढू लागली. सतार झाल्याला पोचण्याच्या वेळी तर त्यांचं सारं अंतःकरण व्यापून गेली.

त्यांना एकाएकी डोहात बुडाल्यासारखं झालं. आतापर्यंत वाटणारा उत्साह, उधाण, ती कीर्ती, ती अभिनंदनं सारी लोप पावली आणि त्या तोडीच्या करुण सुरानी हा चाळीस वर्षांची कडक तपश्चर्या पाठीशी असलेला तापसी सिद्धपुरुष त्या आर्ततेत विरघळून गेला.

आज कितीजणांना त्यांच्यातला रामप्रसाद माहीत असेल? पंडीत रामरंजन नव्हे — एक साधा रामप्रसाद?

आणि माहीत तरी कसं व्हावं? आपल्या पंचवीस वर्षापूर्वीच्या आयुष्याचा त्यांनी कुणालाच पत्ता लागू दिला नव्हता. त्यांच्या गायकीप्रमाणे हेही एक गूढच राहिलं होतं.

साऱ्यांना माहीत होतं ते, एक पंचवीस वर्षाचा उमदा तरुण एक दिवस संगीत क्षेत्राच्या क्षितिजावर अचानक धूमकेतूसारखा उगवतो, आपल्या तडफदार आणि नवीन गायकीनं अच्छया अच्छयांचं लक्ष वेधून घेतो, नवीन घराणं निर्माण करतो, शेकड्यानं शिष्य परिवार तयार करतो आणि आला तसा एक दिवस भर मैफिलीत न गाण्याचं एन उमेदीच्या काळात व्रत घेऊन केवळ विद्यादानच करीत राहतो; एवढंच. सारं काही अकल्पित. ह्या प्रसिद्धीच्या युगात न वसणारं, जुन्या संगीतक्षेत्रातील नाणावलेल्या नायकांसारखं. काहीतरी विक्षिप्त.

त्यांना माहीत होतं ते त्याचं गाणं, त्याची साधना, त्यांची तपस्या आणि त्यातून निर्माण झालेला दरारा

पण आज हे सारं त्या तोडीच्या आर्त सुरात लोपून गेलं. एरवी त्यांनी ते तोडीचे सूर आपल्या कंठातून कितीदा काढले असतील, शिकवले असतील. त्यांचं शास्त्रशुद्ध पंडीती विश्लेषण केलं असेल. हा सूर्य कितीदा उगवताना बघितला असेल, मावळताना बघितला असेल. मग आज नेमक्या साफल्याच्या ह्या दिवशीच हा सूर्यदेव, हे सूर त्यांना व्याकूळ कां करताहेत? छे! ही दुर्बलता बरी नाही. ह्या दुर्बल अंतःकरणातून त्यांचं विजेसारखं तडफदार गाणं उमटावं कसं? सुरांची अवघड तालमय करामत व्हावी कशी? त्यांची ती नावाजलेली अलंकारिक गमके साकार व्हावी कशी?

आत्ताच त्याना आदित्यस्तुतीचे पुढील चरणसुद्धा आठवेनात. मग संध्याकाळी त्यांचं गाणं व्हावं तरी कसं? त्यांनी मान झटकली. छे! हे योग्य नाही. आयुष्यातल्या अशा अनेक प्रसंगी त्यानी दुर्गेचं

**— भास्कर उत्तरवार**

स्तोत्र मनाला स्वस्यता लाभावी म्हणून म्हटलं होतं. त्यांना आज त्या जगन्मातेची तीव्रतेनं आठवण झाली. 'माते, आज अंत पाहू नकोस. चुकलं असेल तर क्षमा कर. माते, धीर दे '

त्यांनी दुर्गेचं स्तोत्र जरा उंच आवाजातच सुरू केलं, 'नमस्ते सिद्धसेनानी । आर्ये मंदारवासिनी

* *

सारा हॉल खच्चून भरला होता. प्रवेशद्वार फलांनी आणि पताकांनी सजविले होते. उदाचा सुगंध सर्वत्र दरवळला होता. साऱ्या दराची तिकिटे केव्हाच संपली होती. तिकिटे मिळाली ते आज काही तरी भव्य दिव्य ऐकायला मिळणार म्हणून हरखून गेले होते. ज्यांना मिळाली नाही ते एक दुर्मिळ वस्तू हातून डोळ्यादेखत निसटून जात आहे म्हणून विषादून गेले होते. मोठ्या दुर्मिळ उत्सवाचे आज आपण साक्षीदार ठरणार ह्या भावनेनं मोहरून आलेले सुन्दर वेषभूषा आणि केशभूषा केलेले स्त्रीपुरुष लाऊंजमध्ये मंद आवाजात आपापसात कुजबुजत होते. विषय एकच. पंडीत रामरंजन, त्यांची तपस्या, त्यांचं संगीत आणि आज होऊ घातलेलं त्यांचं गाणं.












## मियाकी तोडी

**महाप्राणोच्चार्य हुंकारातून उमटलेली**
**तो 'मियाकी तोडी'...**
**पायाखालची वाळू घसरली,**
**घसरते आहे**
**घनगंभीर प्रवाहात ओढी**
**ती 'मियाकी तोडी'**
**प्राणांच्या आत तंबोरे जुळवीत**
**तूं येताच समेवर**
**मी एक आकुल थेंब**
**स्वरमधुच्या परिसीमेवर**
**तंत्र-मंत्राच्या घटपटातून**
**मुक्त झाला अनाडी**
**ती 'मियाकी तोडी'**
**आदिम, अतर्क्य, अकल्पित**
**जाणवले . . . हरवले**
**जडशीळ ओझे सारे**
**स्वरमेळी खोल बुडले**
**प्रगाढ सात्क्षात्काराची ही**
**सपक असेल गोडी !**
**ती 'मियाकी तोडी'**

**–पद्मा लोकूर**

आत नियोजकांची धावपळ सुरू होती. पंडीतजी तेज स्वभावाचे आहेत. त्यांचं स्वरमंडळ नीट जुळून पाहिजे. तंबोऱ्याला झारदार जवारी आलेली पाहिजे. तवला नीट सुरात जुळून पाहिजे. सारंगी नीट लावून पाहिजे. पुन्हा पुन्हा लाऊडस्पीकरची टेस्ट घेतली जात होती. नको तेव्हा त्या लहरी यंत्रानं शीळ घातली तर ? पंडीतजी भरबैठकीवर तडफल्याखरीज राहणार नाहीत.

आठला दहा मिनिटे असतानाच पंडीतजींची गाडी गर्रकन् वळून थिएटरच्या आवारात शिरली. दर्शनी दाराशी असलेल्या बघ्यांमध्ये हालचाल झाली. साऱ्या लाऊंजमध्ये कुजवूज वंद होऊन शांतता पसरली. एका प्रतिभाशाली, नवा इतिहास निर्माण करणाऱ्या कलावंताचे जवळून दर्शन व्हावे म्हणून त्या चकचकीत स्त्रीपुरुषांनी अशिष्ट दिसणार नाहीत इतपत टाचा उचलल्या आणि माना झुकवून पंडीतजींना अभिवादन केले.

तो शृंगारलेला हॉल, ते सुशोभित आणि फुलारलेले स्त्री-पुरुष आणि ते उत्सवमय दृश्य पाहून सकाळपासून अस्वस्थ असलेल्या पंडीतजींच्या अंतःकरणाला फुंकर घातल्यासारखं वाटलं. आपले ह्याही वयात गोंडस आणि बालीश दिसणारे हात जोडून त्यांनी साऱ्यांच्या अभिवादनाचा प्रसन्न अंतःकरणाने स्वीकार केला आणि ग्रीनरूमकडे आपला मोर्चा वळविला.

आणि मग साऱ्या हॉलभर तंबोऱ्याची जवारी दाणेदार सुरांची उधळण करीत घुमू लागली. पडद्याआड पंडीतजींच्या शिष्यांनी ठीक आठाच्या ठोक्याला गहन गंभीर सुरात नटराजस्तवन सुरू केलं. यमनकल्याणाचे ते पावन सूर सारा हॉल व्यापून गेले.

'हे डमरूधर नटराज शुभंकर....'

सूर घुमत असतानाच पुढला पडदा हळुहळू बाजूला सरकत उघडला. मागल्या पार्श्वभूमीला लाल मखमाली पडद्यावर 'पंडीतजी चिरायु रहें' अशी ठळक अक्षरे पिवळ्या फुलानी रेखली होती. निरनिराळ्या वाद्यांच्या आकृत्या काढल्या होत्या. स्टेजच्या मध्यभागी सात आठजण आपल्या वाद्यांसहित ऐसपैस बसू शकतील एवढी पांढऱ्या स्वच्छ रेशमी चादरी अंथरलेली बैठक केली होती. तिच्या तिन्ही बाजूला पांढरेशुभ्र गोंडेदार लोड टेकवून ठेवले होते.

पंडीतजी विंगमध्ये एका सुशोभित खुर्चीवर स्टेजकडे तोंड करून बसले.

त्यांच्या शिष्यवर्गापैकी एक एक आपल्या अधिकारानुसार येऊन हजेरी लावू लागला. आजपर्यंत मिळालेल्या आणि पचविलेल्या पंडीतजींच्या विद्येला आपापल्या मगदुराप्रमाणे साकारून आपल्या कृतज्ञतेचं अर्घ्य पंडीतजींच्या चरणावर वाहू लागला.

हळुहळू कार्यक्रम ऐन भरात येऊ लागला. शुद्ध कल्याण, यमनकल्याण, मधुवंती, दरबारी, सरस्वती, अभोगी कानडा एकामागून एक येऊन त्या गायकांच्या मुखातून वादकांच्या वाद्यांमधून येऊन हजेरी लावू लागले.

कुणी एखादा सुन्दर पलटा घेतला, तानेची बोलउपज नीट केली, गमकेची तान विश्वासाने पेलली की पंडीतजी जागेवरून दाद देऊ लागले. एखादी जागा चुकल्यास नापसंती दर्शवू लागले. जवळच्या शिष्यवर्गाला 'ऐसी गलती नही होनी चाहिए' असा इषारा देऊ लागले. एका तरुण तबलिया शिष्याने तबल्यावर उठानीचा पेचदार तडाखेबंद तुकडा अलगद फेकलेला बघून टाळीही दिली.

हळुहळू सकाळपासूनची उदासीनता लोपून त्यांचं अंतःकरण संगीतमय होऊ लागलं.

प्रेक्षकांमधून क्षणाक्षणाला टाळ्यांचा वर्षाव होत होता. ती प्रत्येक टाळी पंडीतजींच्या गळ्यात हार घालून जात होती.

त्यांना कृतकृत्य झाल्यासारखं वाटू लागलं; सारं विश्व ओंजळीत आल्यासारखं. गेल्या चाळीस वर्षाची खडतर साधना आज त्यांच्या पदरात न मावेल एवढं दान ओतीत होती. ह्यानंतर त्यांचं गाणं आणि मग – वस्स ! आयुष्याचं साफल्यच ! 'आज पातली वांछियली ती वेळ सफ़लतेची '

मध्यांतर झालं. टाळ्यांचा नुसता पाऊस पडायला लागला.

आतापर्यंत सारं कसं दृष्ट लागण्यालायक झालं. संयोजकांचं ऊर भरू आलं. पंडीतजींना दोष द्यायला जागा उरली नव्हती. त्यांना



अनुक्रमणिका






आनंदानं उन्मळून आलं होतं. आपल्या शिष्यांच्या पाठीवरून हात फिरवून 'जीते रहो बेटा', 'खूप बजाया तुमने', 'खूब गाये तुम' असे प्रमानं उद्‌गार काढीत होते. सारं कसं व्यवस्थित होतं. सुंदर होतं.

निरनिराळ्या क्षेत्रातील अधिकारी पुरुष आत येऊन पंडीतजींना अभिवादन करू लागले. त्यांचा शब्द ऐकायला आसुसू लागले.

संयोजकांपैकी एकानं त्यांना गरम केशरी दुधाचा पेला आणून दिला आणि तो तिथेच घोटाळत राहिला; विचारू की नको अशी भीती डोळ्यात घेऊन. त्याची ती भिती हालचाल पंडीतजींच्या लक्षात आली. आज ते आनंदात होते. आज त्यांना कुणी भ्यायला नको होतं. त्याची भीती जावी म्हणून हसून ते म्हणाले, 'अरे, डरो नहीं. काय आहे ?'

तो भीत भीतच म्हणाला.

'बाहेर कुणी एक मुलगी आली आहे.'

'तो क्या ?' हसून पंडीतजी म्हणाले, 'अरे तिला गाणं ऐकायचं असेल माझं आणि आत जागा नाही, हेच ना ? करून द्या तिला जागा. ऐकू दे.'

'एवढंच नाही पंडीतजी. ती म्हणते आपल्या पूर्वी ह्या बैठकीवर बसून तिला गायचं आहे.'

पंडीतजी एकदम चमकले. चिडले. आज केवळ त्यांच्या शिष्यांचं आणि विशेष म्हणजे त्यांचं स्वतःचं गाणं असताना ही अनोळखी पोरगी त्यांच्या अगोदर गाण्याची हिमत करते ?

'तुम्हे मालूम होना चाहिए . . . पण मग त्यांनी स्वतःला सावरलं. आजच्या आनंदाला रागावून गालबोट लावायचं नव्हतं. स्वतःवर तावा घेत ते म्हणाले,

'वा ! बडी हिम्मतवाली लडकी दिखती है. बघू या कशी आहे ती ! आणा तिला इथं.'

नियोजकानं सुटकेचा निश्वास टाकला. लगवगीने तो बाहेर गेला. भोवतीचा सर्व शिष्यदर्ग चकित झाला होता. आपल्या घराण्याच्या गायकांशिवाय कुणाचेही तोंड न बघणाऱ्या ह्या जमदग्नीचे हे उद्‌गार त्यांना नवीनच होते. एका हट्टी आणि अहंकारी माणसाचं हे रूप त्यांनी बघितलंच नव्हतं.

ती मुलगी आली. धिमी आणि विश्वासाची पावलं टाकीत. पंडीतजी आपल्या शिष्यांशी दुधाचे घोट घेत बोलत होते. मारव्यातल्या कोमल रिषभ आणि षड्‌जाचे अगोचर नाते उलगडून सांगत होते. ती मुलगी आल्या आल्या ओठंगून उभी राहिली. ती आल्याचे सांगण्याची कुणाला हिमतच झाली नाही. तशीच काही मिनिटे गेली. आणि मग त्या अठरा एकोणीस वर्षाच्या मुलीनं पंडीतजींना भक्तीभावानं नमस्कार केला. हात जोडले, डोळे मिटले आणि आकाराने षडज् लावला.

सारे एकाएकी चकित झाले. पंडीतजींच्या हातातील पेला तसाच राहिला. ते चमकन झर्कन् वळले.

क्षण गेला, दोन क्षण गेले. त्या मुलीनं लावलेला दमदार षडज् अनंत रेषा रेखीत पुढे चालला होता. तो गोळीबंद, शुद्ध कुठलाही खालचा किंवा वरचा कण नसलेला अविकृत षडज् ऐकून सारेच काय पण पंडीतजीही अवाक् होऊन गेले. सा लागलेलाच होता. जणु अनंताच्या प्रवासालाच निघाला होता. पंडीतजी अस्वस्थ झाले. हे अतर्क्य होतं, अकल्पित होतं. चमत्कार होता. न साहवून ते ओरडले,

'ठेहरो ! तुम कौन हो ? कहाँ गाना सिखा है ? ही षडज्‌साधना कुणी शिकवली तुला ? कोण तुझा गुरू ? बोल कोण तू ?'

ती मुलगी थांबली. त्यांच्या डोळ्याला डोळा देत म्हणाली, मी कोण हे महत्त्वाचं नाही. मला माझी सेवा आपल्या चरणी रुजू करायची आहे, एवढंच जाणते मी. त्याचसाठी शेकडो मैलांचं अंतर तोडून आले आहे.'

सारे थक्क झाले. पूर्वीच्या संगीतकारांच्या चमत्कारांनी भरलेल्या कथा त्यांनी कानाच्या पाळ्या चिमटीत धरून ऐकल्या होत्या. पण आज ह्या विसाव्या शतकात

पंडीतजी लालीलाल झाले. बोलता बोलता त्यांचा स्वर विकृत झाला.

'तुमने बहोत बडा अपराध किया है ! मला माहीत आहे, एवढी हिमत तू एकटी करू शकणार नाहीस. कुणी तरी माझ्यावर सूड उगवायला तुला पाठवलं आहे. ह्या पंडीत रामरंजनच्या कीर्तीवर काजळ ओतायला. त्याच्या चाळीस वर्षांच्या तपश्चर्येची चेष्टा करायला. कोण आहे तो ? बोल, कोण आहे ?'

ते संतापानं नुसते थरथरायला लागले. ते अंगात संचारल्यासारखे दातओठ खाऊन विचारीत होते आणि ती मुलगी डोळ्याचं पातं न लववता एकटक नजरेनं पंडीतजींकडे बघत नम्रपणानं उभीच होती.

**राजकारणातला ' मध्यम ' सूर !**



**भारताला डावा किंवा उजवा नको. सध्या तरी मध्यम मार्गच सोयिस्कर आहे — इंदिराजी.**

त्यांना काही सुचेना. लवकरच ते अनेक वर्षानंतर गायला बसणार होते आणि ह्या मुलीनं त्यापूर्वी जणु त्यांच्या स्वरमंडलाच्या षडज् पंचमाच्या ताराच उस्कटून टाकल्या होत्या.

'ठीक है। तुम्हे बहोत गरूर है। गावो. आज मैं बैठने के पहले गावो. देखूं तुम्हे क्या सिखाया गया है!'

त्यांनी नियोजकांना खूण केली.

'ही मुलगी गाणार आहे. गाऊ द्या. आज माझ्या तपश्चर्येची कसोटी घ्यायचं विधात्याच्या मनात दिसतं आहे. होऊ द्या.'

सारे निश्चल झाले होते. एका अठरा एकोणीस वर्षांच्या पोरीच्या षड्जानं हा तपोनिष्ठ तापसी अस्वस्थ झालेला ते अविश्वासानं बघत होते. तिचा षडज् निःसंशय अभूतपूर्व होता पण म्हणून पंडीतजींसारखी अधिकारी व्यक्ती एवढी अस्वस्थ व्हावी?

नियोजकांची पुन्हा धावपळ सुरू झाली. अनाउन्स करायला तिचं नाव, घराणं, ती गाणार काय वगैरे विचारायला अनाउन्सर पुढे सरला पण ती उभ्या उभ्या तशीच थेट स्टेजवर गेली. बैठकीला तिनं आदरानं प्रणाम केला. आणि पुढ्यात खाली पाय दुमडून बसली. पडदा उचलणाऱ्याला खूण केली.

आत काय चाललं आहे हे माहीत नसणारे श्रोते पडदा उघडताच पंडीतजीऐवजी बैठकीच्या पुढे बसलेली एक किरकोळ मुलगी बघून चकित झाले. एकदम कुजबूज वाढली.

आणि मग एकदम एक गोळीबंद षडज् साऱ्या थिएटरमध्ये घुमून उठला. जाणकारांनी कान टवकारले. ज्यांना फारसं समजत नव्हतं तेही त्या सुराच्या अंगभूत सामर्थ्यानं दिपले आणि चूप झाले.

आणि हळूहळू कुठलेही वाद्य साथीला नसलेली मुलतानी आलापी स्रवू लागली. त्या स्वच्छ दाणेदार आवाजातील कणन् कण मुलतानीच्या आर्त भावव्याकुळ सुरांना लपेटून येऊ लागला. अकार आकार उकार इकार निरनिराळ्या अंगानं ती आलापी नटवू लागले. एक अगम्य आणि समर्पित भावविश्व त्या ठिकाणी साकार होऊ लागलं.



संतापून कापणारा पंडीतजींचा देह ते सूर ऐकून केव्हा शिथिल व्हायला लागला ते त्यांनाही कळलं नाही. ती आलापी, ती गाण्याची पद्धत, ते पलटे, ती खेंच, ते सुरावरचे नेमके मुक्काम हळूहळू त्यांना ओळखीचे वाटू लागले.

मंद्र धैवतावरून तीव्र निषादाला स्पर्श करून येणारीती उपज.... त्यानी डोळे विस्फारले

ही जशी उपज आणि एवढयाशा वयात

ती मुलगी आपलं सर्वस्व ओतून गात होती. जणु त्या तेवढया गाण्यासाठीच ती जन्मली होती. एवढं कार्य केलं की आपल्या मूळ ठिकाणी निघून जाणार होती. तिला जणु जगाचं भानच नव्हतं. समोर बसलेल्या लोकांचं, वातावरणाचं, काळाचं. बस्स! ती आणि तिची मुलतानी. दोन्हीत एक अद्वैत निर्माण झालं होतं. कुणाची सीमा कुठे संपली होती, कुणाची कुठे सुरू होणार होती

अचानक तिनं एक सणसणीत उपज घेऊन बोल अंगानं चीजेचा मुखडा फेकला जुग जग वाट निहारू तोरी

पंडीतजींना विजेचा धक्काच बसला. ही चीज ह्या मुलीजवळ कुठून आली. कुणी शिकविली. ही तीस वर्षांपूर्वीची चीज. रंजना गात असे ती

त्यांनी डोळे मिटून आपल्या सुरब्रह्मात तादात्म्य पावलेल्या त्या मुलीकडे निरखून बघितलं. आणि एकदम साऱ्या शरीरातली शक्ती निघून गेल्यासारखं त्यांना झालं. त्यांच्या अस्थिर झालेल्या कातर नजरेला तिथं रंजनाच दिसायला लागली. तीच शरीराची ठेवण. डोळे मिटून गाताना वर उचलल्या जाणाऱ्या तिच्या भुवया, आकारानं आलाप घेताना खाली ताणली जाणारी निमुळती हनुवटी

ते गलबलून गेले. होय रंजनाच ती. तीस वर्षापूर्वीची. एकत्र सोबतीनं राहिलेली — त्यांच्या बरोबर एकाच वेळी गाणे शिकणारी पण त्यांच्यापेक्षा गाण्यात अधिक गती असणारी—त्यांच्यावर जीव तोडून माया करणारी,—आपले सारसर्वस्व असूनही धर्माची बंधने तोडता न आल्याने ती गुरुपुत्री आहे म्हणून जीवनसाथी म्हणून नाकारलेली आणि एक दिवस तिच्या युक्तीवादाला आणि आर्जवांनाही नकार मिळाल्यानं आपलं रक्तबंबाळ हृदय घेऊन आयुष्याचा अंत करून घेणारी रंजना

जिच्या आठवणी आणि त्यांच्या त्यावेळच्या दुर्बलतेची कायम जाचणी गेली तीस वर्षे लपवून ठेवली—जिच्यासाठी साध्या रामप्रसादचा पंडीत रामरंजन झाला ती रंजना

मुलतानी कणाकणानं फुलत होती. साऱ्या आकारप्रकारानं उलगडत होती. व्याकुळतेची आवर्ते क्षणाक्षणाला निर्माण होत होती. काळीज झाकारून टाकीत होती, उसवून टाकीत होती. अशी मुलतानी ऐकली नाही. कुणी गायली नाही. सम नाही, ताल नाही, टाळी नाही. फक्त सूर आणि सूर. त्या चीजेचे मनातील कढ उफाळून वर आणणारे बोल, ते सूर, ती भावना—बस्स!

(पृष्ठ ४५ वर पहा)





# स्वर सृष्टीचा सु-स्वर दत्तोपंत कोरगांवकर

— गो. शं. हुजूरबाजार



योगायोगावर माझा पुरा विश्वास आणि आमच्या कुलदैवतासमोर मी माझ्या संगीत लेखनाच्या वह्या आदर भावाने सादर करीत असता पुजारीबोवा जे बोलून गेले, आणि लवकरच जे घडले त्यावरून तर मी पुरा योगवादी बनलो! भवानी कमलेश्वर हे आमचे आराध्य दैवत. कोल्हापूर, सावंतवाडी, पेडणे, कोरगाव अशी मजल दरमजल करीत आम्ही कमलेश्वराच्या प्रांगणात येऊन पोहोचलो. देवासमोर नैवेद्य वगैरे सर्व यथासांग जमून आले. वीस वर्षे जमवून ठेवलेले हस्तलिखित पुजारीबोवांच्या हाती दिले. बुवा म्हणाले, 'गाण्याचा शौक असलेले तुम्हीं दुसरे देवभक्त दिसता!' याचा अर्थ मला उमगला नाही. 'यांचे मनोरथ पूर्ण कर' अशी भटजीबुवांनी पिंडीसमोर पुकारणा केली. मी वह्या गुंडाळल्या व गुरुजींना विचारले 'कमलेश्वराचा पहिला संगीत भक्त कोण? उलगडा कराल तर आभारी होईन.'

सभामंडपात येऊन त्यांनी सांगण्यास प्रारंभ केला :

'मला तरी पुरी हकीगत कुठे माहीत आहे? वडिलांच्या सांगीवरून बोललो. पंचेचाळीस वर्षे होऊन गेली त्या गोष्टीला. कोरगांवकर कुटुंबाने सावंतवाडी सोडून मुंबईला बस्तान मांडले. त्यांच्यातला दत्ता हा पोरगा गाण्याचा छंदी. विगरीपासून रागदारीत परवचा आणि कविता गायचा: 'वनी खेळती बाळ ते वल्लवांचे, तुरे खोवती मस्तकी पल्लवांचे'।। पुढे सिनेमात त्याने चाली दिल्या, लखनौपर्यन्त दौड मारली त्याने, फोनो घरोघरी त्याची गाणी गात राही, रेडिओवर होता तो,— वेड लावले हो एके काळी त्याच्या चालींनी! पण हाय! वृद्धीवळातल्या प्याद्याप्रमाणे त्याचा डाव लवकर संपला. जमाना बदलला. अंगात कलागुण असून तो चकाकू शकला नाही!' इतके बोलून पुजारीबुवांनी शाल सावरली व भाषणही आवरले.

या हकीगतीचा माझ्या मनावर फारसा परिणाम होऊ शकला नाही. मी ते सारे विसरलोही. संबंध काय?

पण योगायोगाचा भाग लवकरच पुढे वाढून ठेवलेला दिसला. श्री. जितेन्द्र अभिषकींच्या हवाली मी माझ्या संगीत लेखनाच्या वह्या देऊ केल्या. त्यांना अमेरिका गमनाचा वेध होता व ते पुडके त्यांनी श्री. दीनानाथ दलाल यांच्या कचेरीत पोहोचते केले. पुढे बरीच फोनाफोनी झाली व मी एका सायंकाळी 'दीपावली'च्या खोलीत प्रविष्ट झालो. संपादकांच्या समोर एक वयस्क व्यक्ती आसनस्थ दिसली. मी माझा परिचय करून दिल्यावर श्री. दलाल म्हणाले,

'यांना ओळखता? हे कोरगांवकर. बऱ्याच वर्षापूर्वीपासून हे मुंबई, लखनौ, कोल्हापूरला बोलपट धंद्यात होते. हे म्युझिक डायरेक्टर होते!'

मी विचारले, 'आपले नाव दत्तोपंत का?'

तत्काळ त्यांच्या ओठातून उत्तर आले, 'हो. आपण कसे जाणले?'

त्यावर चार महिन्यापूर्वीची माझी गोमंतक स्वारी व कमलेश्वराच्या देवालयात घडलेली हकीगत मी उभयतांना सांगितली. ज्यांचे कुलदैवत एकच आहे असे आम्ही दोघे केवळ योगायोगाने जवळ आलो होतो. शिवाय दोघेही नाद-वेडे. मी केवळ कागदावर लिहू शकणारा व श्री. दत्तोपंत हे नव्या नव्या चाली लावून सुमारे ४० वर्षे रसिकांना झुलवत ठेवणारे.

या बैठकीत आमचे संभाषण खुलत राहिले व ते अधिकच रंगले; कारण ज्या मराठी भावगीतांनी आमची तरुण पिढी पंचवीस वर्षापूर्वी वेडी झाली होती आणि ज्यांचे 'स्वरसाज कलाकार कोण' हे जाणण्याची आम्ही कधीच कदर केली नव्हती ते कोरगांवकर माझ्या कोपराशीच बसले होते.

आता इथे एका खाजगी गोष्टीचा उल्लेख करायला हरकत नसावी असे वाटते. मी चतुर्भुज होण्याच्या मार्गावर असता, 'वधू ही गोड गळयाने गाणारी असावी,' (संगीत-विशारद ही कागदी पदवी धारण करणारी नव्हे!) अशी एक अट होती. बांधकाम सुरू करण्यापूर्वी इंजीनीयर टेंडरे मागवितो, त्यात स्पेसिफिकेशन्स (मालाच्या गुणावगुणतेचा खर्डा) असतात. तसे, 'गायनी कळा गळघात असावी'









अनुक्रमणिका

अशी अपेक्षा. पहिले टेंडर खोलले जात असता माझ्या वडील बहिणीने वधू-उमेदवारास सोप्यातून माजघरात नेले. काही वेळाने गोड ललकाऱ्या कानी येऊ लागल्या.

'अति गोऽऽड गोऽड ललकारी'

भीमपलास रागातील ती उडती चाल ध्यानात स्थिरावली व ज्या गळघातून ते पद आले त्यातच मी विवाहमंडपात माळ घातली! त्या सुयोगाला आता २७ वर्षे पुरी झाली (४ मे १९४२). दीपावली-कचेरीत त्या पदाच्या स्वर-रचनाकाराचा प्रथम परिचय होत असता तो दिवस आठवला. जीवनात जे नवे परिचय होत रहातात त्यांना काही तरी धागे-दोरे असतात आणि याचा अनुभव येऊन मोठी मौज वाटते. आकाशातील ग्रहांच्या युती या गणिताने ठरवता येत असतील पण माणसामाणसांच्या ज्या गाठी-भेटी होतात त्यात नियतीचाच भाग अधिक असावा असे वाटते. मधमाशी ही मधाच्या शोधार्थ वनोवनी फिरते. संगीत दर्दी व कलाकार यांचे नवेनवे परिचय करून घेण्यासाठी मी ध्यास घेऊन असतो. श्री. कोरगांवकरांचा परिचय घडल्याने नवा लाभ मला घडला, अगदी अकल्पित असा.

आणि ठरल्याप्रमाणे ते एका रविवारी सकाळी आमच्या घरी आले आणि घरच्या प्रमाणे चार तास वावरले. त्यांनी आमच्या



चि. अलंकारचा तंबोरा सुरात मिळवला आणि हार्मोनियमवर तर ते अशा सफाईने बोटे फिरवू लागले की श्री. मयेकरांच्या कारखान्यात उद्योगी सरदारजींनी बनवलेली ती सव्वातीन सप्तकाची श्रुतिमंजुषा जणु त्यांच्या पूर्व परिचयाचीच असावी! 'मी अशा चाली लावल्या तशा चाली लावल्या' इत्यादि खूपच त्यांनी ऐकविले. तसेच आपल्या मराठी, हिंदी, उर्दू स्वरसाजाच्या रचना. गोकुळीच्या गौळणी पाणी भरायचे विसरून कृष्ण कन्हैय्याचे मुरलीगान देहभान हरवून ऐकत उभ्या असत, तसे, साठी उलटलेले कोरगांवकर आण्णा आमच्या घरातील मुलामंडळीना आकर्षून राहिले. कुणाला खरे वाटणेच शक्य नव्हते की, "दिया जलाकर आप बुझाया" या चालीचा निर्माता एक उंच, वजनदार काळा सावळा, मराठी माणूस आहे,—सफेद, विजार, आणि शुभ्र कुडता—आणि कंठातून स्रवणाऱ्या त्या चाली ('किसी तऱ्हा से मोहब्बतमे चैन पा न सके' 'एक अनोखा गम अनोखी सी मुसीबत हो गई' 'रोशनी अपनी उमंगोकी मिटाकर चल दिये' वगैरे अनेक) त्याने स्वतः लावल्या होत्या! तो काळही असा, की आता सम्राज्ञी-पद पावलेली कु. लताही, आपण कोणीतरी नूरजहाँसारखा बोलपट गीतातील ताजमहाल उभारावा, अशी उमेद बाळगून प्रयत्नशील होती. त्या उमेदवारीच्या तरूला फुले आली, फळे आली, जीवनाचे सार्थक झाले! पाकिस्तानच्या निर्मितीनंतर नूरजहाँ भारताला पारखी झाली व कु. लता बोलपट पार्श्वगायनातील सम्राज्ञी बनली. कोकिळेसारखी कोकिळाच, तिला प्रतिस्पर्धी नाही. पण त्या वेळचे गुलामहैदर, शामसुंदर, खुर्शीद अन्वर, खेमचंद, अनिल विश्वास आणि फिरोझ निझामी यासारखे अ-मराठी संगीत दिग्दर्शक सिनेसृष्टीत वावरत असता त्यात के. दत्ता हे नाव विनीला होते. पण काळाचा महिमा म्हणावा, की काय म्हणावे ते समजत नाही, हिंदुस्थानात या महाराष्ट्रीय संगीत दिग्दर्शकाचे नाव गाजता गाजताच लखनौच्या दोन वर्षांच्या वास्तव्यामागून सतत दहा वर्षे धडपड करूनही पूर्वीचे यश गाठता आले नाही त्याला! कोरगांवकर आण्णा हे मागेच पडत राहिले. विशीच्या सळसळत्या यौवनात नट व्हावे म्हणून सरदार शेठ चंदुलाल शाह यांच्या रणजित सिनेटोनमध्ये प्रवेश केला होता त्यांनी. पण नाव कमावले ते नव्या नवलाईच्या चाली लावणारा म्हणून, आणि पन्नाशीच्या उंबरठ्यावर असता त्यांना काढता पाय घ्यावा लागला. आणि लखनौची मेल तेथील म्युझिक पसारा तसाच टाकून (मेलडी) मुंबईला आली ती तिथेच सायडिंगला पडली! पन्नासाव्या वर्षी तर या ताडमाड उंच देहधारी पुरुषाला पहिला हृदय-विकाराचा झटका आला आणि भाऊ-बहीण, लेकलेकी, नात आणि कर्तव्यदक्ष सहधर्मचारिणी यांच्या प्रेमळ सहवासात ते कालक्रमणा करीत आहेत, आता.

आण्णांचे स्मृतिधन मोठे विपुल व विविध आहे. आणि शिवाय सिनेमा जीवनातील फुरसदीच्या वेळात त्यांनी ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला आहे. सुरांच्या आणि लयीच्या मिलाफाने शब्दांना अर्थच येतो असे नव्हे तर रूप, गंध व रंगही प्राप्त होतो हे ऐकत

(पृष्ठ ४३ वर पहा)












# हिरव्या क्रांतीची प्रसादचिन्हे



## महाराष्ट्राची भूमी सुजला सुफला होत आहे

संचालक, प्रसिद्धी संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई.




प्रा. अशोक दामोदर रानडे

भारतीय संगीत आणि चित्रपट यांच्या संबंधाचा विचार करावयास लागताच प्रथमतः असे लक्षात येते की वास्तविक पहाता या प्रश्नाचे स्वरूप एका उपप्रश्नाचे आहे. एकंदरीने संगीत आणि चित्रपट यांचा संबंध कसा असतो या मूळ प्रश्नातून भारतीय संगीत आणि चित्रपट यांच्या संबंधाचा उपप्रश्न होतो. संगीत आणि चित्रपट यांच्या संबंधाविषयी जी काही वैचारिक भूमिका आपण पायाभूत मानू त्याच भूमिकेतून आपल्याला वरील उपप्रश्नाचे उत्तर मिळणार आहे. निदान त्याची दिशा निश्चित होणार आहे.

**चित्रपटाशी संगीताचे नाते**

चित्रपट आणि संगीत यांच्या परस्पर संबंधाविषयीची भूमिका सूत्ररूपाने पुढीलप्रमाणे मांडता येईल

(१) जेव्हा जेव्हा एखादा आविष्कार अनेक कलांची संगम-भूमी बनतो तेव्हा तेव्हा त्यात कार्यकारी होणाऱ्या कलांचे कमी-अधिक महत्त्व निश्चित होते व त्यानुसार एकत्र येणाऱ्या विविध कलांना कमीअधिक वाव मिळतो. याचे प्रमाण विविध आविष्कारात बदलते राहू शकते पण तरीही एकंदरीने पाहता विशिष्ट कलेला अधिक महत्त्व प्राप्त होणे हे आविष्काराच्या स्वरूपातच अंतर्भूत,

**........श्रोतृवर्गात नि प्रेक्षकात सुशिक्षितांचा भरणा वाढत आहे, आवडीनिवडीपासून अभिरुचीच्या दिशेने वाटचाल सुरू झाली आहे, हेच या काळातले आशास्थान झाले आहे.**

जनतासंपर्काची नभोवाणी, दूरचित्रवाणी, चित्रपट इ. जी साधने आहेत त्यापैकी नभोवाणी आणि चित्रपट यांनी आपल्या जीवनात आता निश्चितपणे स्थान पटकावले आहे. त्यांची अपूर्वाई वाटू नये, त्यांचे वेगळपण जाणवू नये इतक्या बेमालूमपणे त्यानी आपल्या दैनंदिन जीवनव्यवहारात आपला पाय रोवला आहे. परंतु एवढेच त्यांचे महत्त्व नाही. इतक्या मोठ्या प्रमाणात या जनता-संपर्क साधनांचा वापर होत असूनही त्यांच्या व आपल्या संबंधाचे स्वरूप काय, त्यांच्यामुळे आपल्या जीवनावर काय परिणाम झाले आहेत, या भल्याबुऱ्या परिणामांचा सांस्कृतिक संदर्भात विचार करण्याची नैतिक निकड आपल्याला भासावयास नको काय इ. प्रश्नांचा अजूनपर्यंत आपण फारसा विचार केलेला नाही. या साधनांचे परिणामकारिकत्व आपल्याला पटले आहे हे यापायी खर्च होणाऱ्या वाढत्या पैशावरून आणि इतर शक्तींच्या व्ययावरून कळून चुकते. पण असे असूनही वर उल्लेखलेले व (तसेच इतर) प्रश्न आपल्यासमोर फारसे उभे राहिलेले दिसत नाहीत. चित्रपट इत्यादीना आपण इतके गृहीत धरले आहे की त्यांच्या विषयी विचारच करावयाचे आपण सोडून दिले आहे. परिणामतः या साधनांनी व्यापलेला आपल्या जीवनातील मोठा भाग, त्यांचे पटलेले परिणाम-कारिकत्व यांच्या तुलनेने पाहता त्यांच्याविषयीचा विचार मात्र फार तोटका राहिला आहे. भारतीय संगीताच्या संदर्भात आपण चित्रपट या एका जनतासंपर्क साधनाविषयी येथे उहापोह करणार आहोत तो या विचारास चालना देण्याच्या दृष्टीने.

अंगभूत असते. एखादे नृत्यनाट्य घेतल्यास त्यात अभिनय, चित्र, संगीत इ. अनेक कला असतात हे उघड आहे. पण तरीही मुख्यतः हालचाल वा गती याला त्यात अधिक वाव मिळावा हे स्वाभाविक असते. चित्रपटाच्या बाबतीत असेच म्हणता येईल. संगीत, साहित्य, चित्र, अभिनय, इ. अनेक कलांची संगमभूमी असलेल्या या प्रकारात दृष्य कलांना अधिक वाव मिळणे हे अधिक स्वाभाविक आहे. संगीताला मिळणारा वाव हा कमीअधिक असेल पण दृश्य कलांच्या मानाने पाहता त्याचे स्थान दुय्यमच राहणार. एक साहाय्यक कला म्हणून त्याचे महत्त्व जरूर असते पण दृश्य कलांच्या व चित्रपटात होणाऱ्या त्यांच्या आविष्कारांचे बोट धरूनच संगीत त्यात वावरते.

(२) साहाय्यक म्हणून वावरणाऱ्या संगीताचे कार्य निश्चित-पणे काय यासंबंधी विचार करताना दोन गोष्टी डोळ्यापुढे येतात: पहिली ही की एकच गोष्ट दोन कलांनी साधणे हे अनावश्यक आहे किंबहुना अशक्यही आहे. उदाहरणार्थ, नदीकाठच्या संध्याकाळचे वातावरण चित्रित होत असता संथ वाहणारा प्रवाह, वातावरणातला धूसरपणा, परतणाऱ्या गाई या साऱ्या दृश्य आविष्कारामुळे जे काही सूचित होत असते तेच यावेळेस मागे वाजणाऱ्या यमनाच्या स्वरांनी होते काय ? कदाचित् एखादा असे म्हणेल की यावेळेस देवळात होणाऱ्या आरत्या व घंटानाद यांची योजना केली तर काय होईल ? या प्रश्नाचे उत्तर असे की आरत्या, इ. मुळे नदीकाठची एक संध्याकाळ स्थापित होईल. संध्याकाळचा व आरत्यांचा जो दैनंदिन साहचर्य-संबंधी आहे त्यामुळे हे शक्य होईल. संध्याकाळचाच भाग म्हणून आरती व घंटानाद हे आपल्या मनात रुजलेले असल्याने त्यांचे या








दृश्याच्या चित्रिकरणाच्या वेळी येणे हे अपरिहार्य ठरेल. डोक्यावरोवर माणसाची पाठही खोलीत यावी तसे होईल. पण सतारीवर याच वेळी यमनाची सुरावट छेडली तर या दृश्याशी यमन व सतार यांचा साहचर्यसंबंध नसूनही दृश्याच्या अर्थात भर पडेल. अनुभव अधिक गहिरा, तीव्र करण्याकडे अशा संगीताचा कल असतो. एकंदर अनुभवाला आणखी एक परिमाण मिळवून देण्याची कामगिरी संगीत बजावीत असते. किंवहुना वातावरणनिर्मिती दृश्यकलांच्या घटकानी आधीच केलेली असल्याने तेच काम पुन्हा करण्याच्या भरीस न पडता संगीत आपला असा वेगळा मार्ग रेखिते; परंतु भावनासादृश्यांनी ते युक्त असते. वातावरणनिर्मिती इ. दृश्य आविष्कार समृद्ध करणारे ते ध्वनी व या सर्व आविष्कारास आपल्या वेगळया चौकटीचा संदर्भ देऊ करणारे ते चित्रपटसंगीत अशी ही या प्रकाराची मोडणी आहे.

## सांगीतिक स्वातंत्र्य

साहाय्यक म्हणून वावरणाऱ्या संगीताचे चित्रपटात स्थान काय या विषयीची लक्षात घ्यावयाची दुसरी गोष्ट म्हणजे ते जरी संगीत म्हणून स्वयंपूर्ण नसले (साहाय्यक म्हणून वावरताना स्वयंपूर्णता अर्थातच शक्य नाही) तरीही वातावरणनिर्मिती इ. अंतर्भूत असणाऱ्या पार्श्वध्वनी या घटकापेक्षा त्याला स्वतःची अशी संगती असते.हे संगीत नुसते ऐकले असता मधुर ध्वनींच्या समूहाच्या वरची व स्वयंपूर्ण संगीताच्या थोडी खाली अशी त्याची पातळी असते हे लक्षात यावयास वेळ लागत नाही. असे असल्याशिवाय संगीत दृश्यांतर्गत अनुभवास वेगळे परिणाम प्राप्त करून देऊ शकणार नाही. स्वयंपूर्ण न होता अपूर्णाच्या वर राहण्याचा, स्वतःची अशी संगती साधत असतानाच दृश्य आविष्काराच्या संगतीस छेद न देण्याचा तारेवरचा नाच चित्रपट संगीतास साधावयाचा असतो. असे न झाल्यास ते केवळ परिणामकारक ध्वनींच्या पातळीवर रहाते वा 'लोकप्रिय' संगीताच्या माळेत जाऊन वसते. या दोन्ही जागा चित्रपट संगीताच्या नव्हेत. चित्रपट संगीताला स्वायत्तता असते, स्वराज्य नसते. पण पार्श्वध्वनींप्रमाणे ते गुलाम नसून त्यास एक प्रकारचे सांगीतिक स्वातंत्र्य असते असे चित्रपट संगीताच्या चित्रपटातील स्थानाचे वेगळया भाषेत वर्णन करता येईल.

चित्रपट आणि संगीत यांच्या संबंधावावतचे तिसरे सूत्र म्हणजे त्याची प्रतीकात्म बनण्याची शक्ती हे होय. चित्रपट संगीत हे भावनांना संवादी नसून भावस्थितींना संवादी असते. इथे संवादी याचा अर्थ responsive, मनात काहीतरी प्रतिक्रिया निर्माण करणारे एवढाच घ्यावयाचा आहे. देश-काल संबंध अशा विशिष्ट परिस्थितीखेरीज इतर सर्वत्र हे सूत्र लागू पडणारे आहे. समजा पहाटेचा देखावा चित्रित झाला आहे, हळुहळू उगवणारा सूर्य, त्यामुळे प्रकाशमान होणारे क्षितिज, हे झाले चित्रपटातील दृश्यकलासंबद्ध घटक. यावरोवर पक्ष्यांची किलबिल, गाय-वासरांचे हंबरणे वा ब्राह्मणांचे स्तोत्रपठण इ. ऐकविणे हा झाला पार्श्वध्वनीचा वातावरण निर्मितीसाठी केलेला उपयोग. ह्या दोन्ही मिळून घटना वा प्रसंग वा दृश्य स्थापित होते. पार्श्वध्वनी इथे स्वतःचे असे वेगळे अस्तित्व जाणवून देत नसून संकल्पित दृश्याच्या उभारणीतील एक अत्यावश्यक घटक म्हणून ते येत असतात. एरवीच्या जीवनातही हे वा अशा प्रकारचे इतर ध्वनी अशा दृश्यावरोवर असतातच व म्हणून चित्रपटातही ते येतात. पहाट, याचा 'सकाळ आधीचा दिवसाचा काल' असा काहीसा वाच्यार्थाच्या पातळीवरील अर्थ सूर्य उगविण्यासारख्या आधारभूत घटनेने आपल्याला कळतो. दैनंदिन जीवनाची काही काळ थांबवलेली वाटचाल उत्साहाने पुन्हा सुरू करावयाचा काल असा पहाट या शब्दाचा संकेतार्थ (वाच्यार्थापेक्षा याची अर्थवर्तुळे अधिक विस्तारित पण कमी नेमकी असतात) किलविल इ. वातावरणनिर्मितीसाठी अवतरणारे घटक सुचवितील. आता पहाट होण्याच्या दृश्याचा संगीत जो अर्थ सांगू पाहील तो अधिक संदिग्ध पण त्याचवरोवर अधिक व्यापक असेल. सनई, सरोद इ. कोणतेही वाद्य असले तरी वरील दोन्ही अर्थ-पातळयांना एका वेगळयाच भावस्थितीची डूव मिळू शकेल. ह्या भावस्थितीचा एका विशिष्ट भावनेशी वा भावानुभवाशी संबंध नसून भावनासमूहाशी असतो. त्यामुळे सनई–मंगल वाद्य इ. साचेवंद, ठोकळेवाज समीकरणे वाजूस ठेवून उत्साह निरुत्साह व उत्साहाचा अभाव (Sense of elation, dejection and indifference) या सर्वशक्य व सर्वसामान्य भावस्थितींना आवाहन करण्याचा संगीताचा हेतू इथे साध्य होण्याची शक्यता असते व चित्रपट संगीताचे हेच काम होय. यामुळे प्रत्येक प्रेक्षक उत्साह इ. भावस्थितींचा अनुभव इतरांवरोवर घेतोच पण शिवाय व्यक्तिगत अनुभवांचे अशा प्रसंगांवरोवर असलेले मानसिक संबंधही तो मुक्त करू शकतो. इथे संगीत व्यंजनार्थाच्या पातळीवर जाते असे म्हणता येईल. इथे संकेतार्थ कायम ठेवूनही प्रेक्षक व्यंजनार्थाची समृद्ध 'अर्थ-पार्श्वभूमी' (Semantic hinterland) अनुभवू शकतो. अनेकांना समान असा अनुभव घेत असतानाच स्वतःचा असा खास व्यक्तीगत अनुभव (आणि तोही अभिप्रेत असलेल्या एकंदर कलानुभवास धक्का न पोचता) उपलब्ध करून देणे हे चित्रपट संगीताचे कार्य असते. या विवेचनाच्या पार्श्वभूमीवर आता आपल्या चित्रपटसृष्टीचे अवलोकन करण्यास हरकत नाही.

## अजून मागासलेली अवस्था

सहजासहजी लक्षात येण्यासारखी गोष्ट अशी की आमचे चित्रपट संगीत अजून पार्श्वध्वनीचे कार्य करण्यातच बहुतांशी गुंतले आहे. दृश्याची परिणामकारकता वाढविणे आणि दृश्याला अधिक एक परिमाण प्राप्त करून देणे यातला भेद आमच्या संगीतास अजून उमगलेला नाही. आपले स्वतःचे असे स्थान चित्रपटात आहे, आपले स्वतःचे असे कार्य आहे आणि ते कार्य करण्याच्या आपल्या अशा पद्धती आहेत याचा आमच्या संगीतास विसर पडला आहे. चोर, खुनी इ. आला असता मंद भयानक स्वर काढणे, शोक झाला असता तारस्वरात तरंगत रहाणे वा पाण्याचे तरंग दाखविण्यासाठी सतारीच्या तर्फा वाजविणे असल्या कामातच अजून आमचे संगीत गुरफटले आहे.









अनुक्रमणिका

चित्रपटसगीत म्हणजे काय याची आमच्या सगीत दिग्दशकांना जाणीव नाही याचे उत्तम उदाहरण म्हणजे अनेक मुलाखतींतून आपल्या 'हिट' गाण्यांची त्यांनी केलेली भलावण. गाणी 'हिट' होतात याचाच अर्थ चित्रपटाबाहेर त्यांना अस्तित्व प्राप्त होते. गाणी संगीत म्हणून स्वयंपूर्ण होतात. सांगीतिक संचितावरच उभी राहू शकतात. ती चित्रपटाच्या तणाव्यातून बाहेर काढली असता चित्रपटाचे काहीही नुकसान होऊ नये अशीच अनेक वेळा परिस्थिती असते. आपले संगीत चित्रपटयोग्य होणे यापेक्षा लोकप्रिय व्हावे असा दृष्टीकोण आमच्या संगीतरचनाकारांचा असतो आणि याचे काही सांगीतिक दुष्परिणामही झाले आहेत.

खुद्द शास्त्रीय संगीताची बाब घेतली तर चित्रपटात येणारे शास्त्रीय संगीत अनेकदा व्याज-शास्त्रीय असल्याचे आढळते. ठराविक चक्री ताना, तिय्ये यांच्या खुणा जागोजाग पेरल्या की हे व्याज-शास्त्रीय संगीत तयार होते. लोकांना हे शास्त्रीय संगीत असल्याचे कळावे यासाटीच जणू त्यावर ढोवळ खुणांची लेबले लावलेली असतात. यामुळे शास्त्रीय संगीताच्या चुकीच्या कल्पना उराशी बाळगून आमचा श्रोतृवर्ग एकंदर शास्त्रीय संगीताकडे वळू लागतो. तशाच खुणा, तोच चटपटीतपणा यांचा शोध घेऊ लागतो. भातुकलीच्या चष्म्यातून खऱ्या संसाराकडे पहाणारा जसा स्वतःचे हसे व जीवनावर अन्याय करतो तोच प्रकार व्याज-शास्त्रीय संगीताने भारलेल्या श्रोत्याकडून शास्त्रीय संगीताबाबत होत रहातो. तीन-साडेतीन मिनिटात नकली फुलोरा धारण करणाऱ्या व्याज-शास्त्रीय संगीताने कान भरणारा श्रोता हळुहळू भारदस्तपणे आपला इमला बांधणाऱ्या शास्त्रीय संगीताच्या ग्रहणास आवश्यक ती शांत, प्रसन्न, चित्तवृत्ती अंगी आणूच शकत नाही. त्याला अस्सल शास्त्रीयाचे रूपच पेलेनासे होते.

आजकाल लोकसंगीताचाही आमचे संगीतरचनाकार पुष्कळ उपयोग करतात. लोकसंगीताचा द्रुतगती, सहज कळण्याजोगा, आणि शब्द व नृत्य यावर अवलंबून असणारा जेवढा भाग आहे त्याचाच उपयोग चित्रपटात भरपूर झालेला दिसतो. हेही खरे लोकसंगीत कोणत्या अर्थाने म्हणावयाचे ? विविध वाद्ये, त्यांची आकर्षक योजना आणि दृष्याचे भरपूर साहाय्य यांची भरपूर प्रक्रिया झाल्यावरच हे संगीत चित्रपटात अवतरत असते. यामुळे काहीशा उघड्या-नागड्या व साध्यासुध्या लोकसंगीताचे मूल्य व त्याचे सांगीतिक श्रेष्ठत्व जोखण्याची श्रोत्यांची पात्रता मात्र कमी झाली आहे. कीर्तनातला 'रामकृष्णहरि' सिनेसंगीताची स्वरलक्तरे राजवस्त्रे म्हणून मिरवू लागला तेव्हापासून अनलंकृत, लोकांना सहज सहभागी करून घेऊ शकणारे लोकसंगीत—भजनी संगीत मागेच पडले. भजनी ठेक्यांची वा एकतारी टाळ-चिपळया-झांज यांच्या साध्यासुध्या पण अस्सल वैशिष्टयपूर्णतेची आम्हाला ओळखच पटेनाशी झाली,

## सुगम संगीताचे आजचे स्वरूप

सुगम संगीत असे ज्याला म्हणता येईल त्याचीही स्थिती अशीच. वाद्यमेळ आणि गायक-गायिकांचे अनैसर्गिकरीत्या गोड-गोड वाटणारे आवाज त्यामुळे आता नैसर्गिक आवाज वा केवळ आधारस्वरांच्या जोडीने अवतरणारा सच्चा सुरेलपणा याची आमच्या श्रोत्यांना जाणीवच होत नाही. मसालेदार पदार्थ खाऊन साध्या स्वयंपाकाची चव कळेनाशी होणे म्हणजे जिव्हेची संवेदन शक्ती कमी झाल्याचे लक्षण आहे. कर्कश पण भरगच्च वाद्यमेळांच्या सतत उपयोगाने आमचे सुगम संगीत वटवटीत झाले आहे. चालींच्या बाबतीतही ठराविक हळुवार संगीताचा होणारा सार्वत्रिक उपयोग पाहिला की एका शाहीराने 'आमचे गायन स्त्रैण झाले आहे' असे उद्गार काढले होते त्याची आठवण होते. भावार्त म्हणता म्हणता आमची भावगीते भावरंजित व पाठीचा कणा नसलेली हळुवार गीते बनली आहेत. अशीच गीते करून करून आमच्या संगीत रचनाकारांनी आपली शक्ती क्षीण केली याचे प्रत्यंतर आणिबाणीच्या वेळेस कुत्र्याच्या छत्र्यांप्रमाणे उगवलेल्या असंख्य पण निकृष्ट समरगीतांवरून आले. जोम, उत्साह व मर्दानी संगीत आमच्यातून नष्ट होण्यास चित्रपटांचे पुष्कळच सहाय्य झाले आहे !

आता पाश्चात्य पद्धतीचे संगीत आमच्या चित्रपटात येत आहे तेही असेच पाणी मिसळून. पाश्चात्य वाद्ये आली हे चांगलेच झाले. पण त्यांच्या उपयोगात मात्र आपल्याकडे अल्पवयीन श्रीमन्त धनिकांची उधळपट्टी करण्याची वृत्तीच दिसते. आणि पुन्हा हार्मनी-टाइपचे न समजून केलेले कर्णकटु प्रयोग आहेतच. निशागृह गीते आणि त्यांचे उपयोजन यांचा आता होत असलेला सरसकट उपयोग निश्चितपणे चिंतेचा विषय आहे. निकृष्ट परदेशी गहू आणि निकृष्ट परदेशी संगीत सारख्याच आशाळभूतपणे आम्ही रिचवितो. कारण दृश्याच्या प्रलोभनाने आणि शर्करावरणाने आपण काय ग्रहण करीत आहोत याची आपल्याला जाणींवच होत नाही.

या सर्व काळ्या चित्रात मला आशादायक अशी एकच गोष्ट दिसते. ती म्हणजे आमच्या श्रोतृवर्गात आणि प्रेक्षकात आता अधिकाधिक सुशिक्षितांचा भरणा होत आहे. आवडी-निवडीपासून ज्याला अभिरुची म्हणता येईल तिकडे आमचा प्रवास आता सुरू झाला आहे. एका प्रभावी परकीय संस्कृतीच्या परिणामांचा व तिच्या सामर्थ्यस्थानांचा विचार करून त्यापासून योग्य तो बोध घेण्याची खरी वेळ आता येऊन ठेपली आहे. आमचा स्वतःचा सांस्कृतिक वारसा काय व त्याचे स्वरूप काय याचाही विचार आताच केला पाहिजे. समाज व प्रबोधन आणि सांस्कृतिक नव-उत्थान असा आपल्या सामुदायिक प्रयत्नांचा क्रम असायला पाहिजे. यासाठी स्वतंत्र प्रज्ञेच्या आणि वारंवार कात टाकू शकणाऱ्या संगीत रचनाकारानाही आपले कर्तव्य बजवायचे आहे.

● ● ●



# सूर आणि नूर

मंगेश कुळकर्णी

पहाटेची वेळ आहे. कोंबडे आरवायला लागले आहेत. मिर्जा नौशा मेण्यात बसला आहे. चार तगडे भोई मेणा नेताआहेत. मिर्जा नौशाचा चेहरा म्लान दिसतो आहे. आपण मुशायऱ्यात आपली सर्वात सुन्दर गजल ऐकवली, पण आपल्याला कुणीच दाद दिली नाही, यामुळे तो खिन्न झाला आहे.

फक्त एक, नवाब शेफ्ताने त्याच्या कलामला दाद दिली आणि दुसरा सदरउद्दीन आर्जुदा! पण भरलेल्या मुशायऱ्यांच्या मैफलीत, फक्त दोघांची दाद येऊन काय उपयोग? मिर्जा नौशाची खिन्नता आणखीनच वाढली, जेव्हा लोकांनी जौकला पुन्हा पुन्हा दाद दिली. कां, तर तो बादशहाचा उस्ताद होता.

मुशायरा चालूच होता. पण मिर्जा नौशा उठून बाहेर आला. बाहेर येताच तो मेण्यात बसला. "हुजूर, घरी चलायचं?" भोयांनी विचारलं.

"नही, आम्ही आता काही वेळ सैर करणार आहोत. अशा रस्त्यावरून चला, की जे आता सुनसान असतील." मिर्जा म्हणाला.

बराच वेळपर्यन्त भोई चालत होते. सारं कसं शांत होतं. चौदहवीचा चंद्र अस्ताईकडे झुकला होता. त्याचा प्रकाश उदास झाला होता.

अशाच एका शान्त चौकातून मेणा जात होता. तोच दुरून कोठूनतरी, वातावरणाचा अलगद भेद करीत, सारंगीचे मधुर सूर, मिर्जा नौशाच्या कानी पडले. सूर भैरवीचे होते. थोड्याच वेळात कुण्या स्त्रीचा, थकलेला, दर्दभरा आवाज, सारंगीच्या सुरात मिसळला.

नौशा दचकला. त्याच्याच गजलीतला एक शेर, भैरवीच्या सुरात तरंगत होता.

"नुकता चीं है गमे–दिल उसको सुनाए न बने
क्या बने बात जहाँ बात बनाए न बने"

* *

दूर एका कोठ्यावर मलिकाजान आळस देते आहे. विस्कटलेल्या बिछायती. आणि त्यावर विखुरलेल्या मोगऱ्याच्या आणि गुलाबाच्या पाकळ्या, मैफल संपून बराच वेळ झाल्याची जाणीव करून देताहेत.

मलिकाजाननं एक दीर्घ जांभई दिली आणि मान हलवून आपल्या,–काळ्या सावळ्या, मोठमोठ्या काळ्याभोर डोळ्याच्या, नोचीला–जी तक्क्यावर डोकं टेकून आपली नाजुक बोटं चोखत होती,–म्हटलं,

"मोमन आहे, शेफ्ता आहे. आर्जुदा आहे. उस्ताद शाह जौक आहेत, मला समजत नाही, त्या नवशिक्या शायरच्या कलाममध्ये काय असं आहे, जेव्हा तेव्हा तू त्याचीच गजल गावीस!"

नोची हसली. तिचे मोठेमोठे काळे डोळे हसले. एक उसासा टाकून ती म्हणाली, "... देखना तकरीर की लज्जत कि जो उसने कहा,







मैंने यह जाना कि गोया यह भी मेरे दिल में है। .....मलिकाजाननं पुन्हा एक जांभई दिली, "आता झोप बघू! फार वाट पाहिलीस त्या जमादार हशमत खाँची !"

नोची बोटात बोटं गुंतवून, हात वर करून, एक जांभई देत म्हणाली, "आता येतीलच इतक्यात ! मी तर त्यांना सांगितलं होतं, की मिर्जा गालिबच्या समोरून शमा हटताच, त्यांची गजल उतरवून फौरन इकडं या."

"त्या मूर्ख गालिबसाठी तू आपली निंद हराम करणार आहेस का ? " मलिकाजान तोंड वेंगाडून म्हणाली.

नोची हसली. समोर फिद्दन मियाँ सारंगी खाली ठेवून विडा लावण्यात रंगला होता. नोचीनं तानपुरा उचलला. आणि ती तारा छेडू लागली. आपोआप तिच्या ओठातून; सूर धरून, शेर निघाला

...नुक्ताचीं है गमें–दिल उसको सुनाए न बने

क्या बने बात जहाँ बात बनाए न बने

फिद्दन मियाँ दचकला. पण लगेच डोळे मिटले गेले. सारंगीच्या तारांवर त्याचा गज फिरू लागला.

....मैं बुलाता तो हूं उसको मगर ए जज्वा-ए-दिल

उसपे बन जाए कुछ ऐसी कि बिन आए न बने

–हळुहळू शेरमधील शब्द बदलले.

....मैं बुलाती तो हूँ उसको मगर ए जज्वा-ए-दिल

उनपे बन जाए कुछ ऐसी कि बिन आए न बने.....

—अचानक मलिकाजान चपापली. तिनं नोचीला संकेत केला. तीही चपापली.

समोर दारात मिर्जा नौशा उभा होता.

नोचीन उठून आदाब केला. मलीकाजान स्वागतासाठी पुढं झाली.

"आईये आईये, तसरीफ लाइए ! बडी खुश-किस्मत की आपल्यासारखे रईस, आम्हा गरीबांच्या कोठीवर आलात, आपल्या येण्यानं माझं घर रोशन झालं."

मिर्जा नौशा बसत म्हणाला, "तुमचा गळा फार सुरीला आहे. तुमच्या आवाजात दर्द आहे. न जाणो कां, मी बेखटक आत आलो ! आपलं नाव मी विचारू शकतो का ?"

नोची त्याच्या समोर बसत म्हणाली, "जी, मला चौदहवी म्हणतात." मिर्जानं स्मित केलं. "यानी आज की रात !"

चौदहवी हसली. "फार सुन्दर गाता तुम्ही," मिर्जा नौशा म्हणाला, "जरा पुन्हा तीच गजल गाता ? कोण जाणे कुणाची आहे – नुक्ताचीं है ग़में – दिल... – हां, शुरू करो !"

चौदहवीला फर्माइशची ही रीत आवडली नाही. ती जरा कडवटपणानं म्हणाली, "ही गजल गालिबची आहे. आणि ग़ालिब समजणं साधी गोष्ट नाही...!

"क्यों ?" नौशानं विचारलं.

"समजलाच तर कुणी पुख्ताकार. आपल्या सारखे नौजवान नाही. मिर्जा हसला, "भाव दाखवून गा, काही भावांवरून अंगांवरून शायद समजून घेईन !"

"भावाचा भाव फार महेंगा पडेल" आपलं अपरं नाक उडवून चौदहवी म्हणाली.

मिर्जा काही क्षण गप्प बसला. मग म्हणाला,

"आपल्याला ग़ालिबचा कलाम फार पसन्द आहे ? "

"जी हाँ" चौदहवी हसून खाली पहात म्हणाली.

"हुजूर, किती वेळा तिला समजावून चुकले, की जौक़ आहे, मोमिन आहे, नसीर आहे, शेफ्ता आहे, सर्व जाने माने उस्ताद आहेत. पण कोण जाणे त्या पोरट्या ग़ालिबमध्ये, काय खास बात आहे ! आपण मोमिनची फर्माइश कराल आणि ही ग़ालिब शुरू करून देईल." आतापर्यन्त गप्प असलेली मलिकाजान गडबडीनं म्हणाली.

मिर्जा नौशा चौदहवीकडे हसून पहात म्हणाला,

"ऐसी कोई खास बात होगी।"

चौदहवी गंभीर झाली, "यह तो वही समझे जिसे लगी हो।"

"क्या मैं सून सकता हूँ, की वह आपके दिलकी लगी क्या है ?" मिर्जा नौशानं मिस्कीलपणानं विचारलं.

चौदहवीनं एक उसासा टाकला, "न पुछीए ! कुठे मी गरीब डोमनी, कुठे गालिब ! जाने दीजीए, सांगा आपण कुणाची ग़ज़ल ऐकणार ? "

"ग़ालिबची" मिर्जा हसून म्हणाला, आणि हवं तर मी तुम्हाला गालिबकडे नेऊ शकतो. चौदहवीचा चांद 'असद'च्या घरी उगवेल बघा !"

चौदहवी गंभीर झाली, "मी अशी, ते काय विचारतात मला...!

...खाक हो जाएंगे हम, उनको खबर होने तक..."

–मुशायऱ्यात उतरलेला मिर्जा नौशाचा नूर पुन्हा फुलला. त्याच्यासमोर








काळी-सावळी, मोठमोठ्या डोळ्यांची, एक सुन्दर युवती बसली होती, जी त्याच्या कलामवर बेहद प्रेम करीत होती.

"तुम्ही गालिबला कधी पाहिलंय ?" नौशानं विचारलं.

"नहीं" चौदहवी उत्तरली.

"मी त्यांना ओळखतो. मोठे रईस आहेत. तुमची इच्छा असली, तर आणू शकेन मी त्यांना इथं !"

"क्या सच् ?" चौदहवीचा चेहरा फुलला.

"मी कोशीश करीन." मिर्जा म्हणाला. आणि त्याने खिशातून एक कागद काढला. "मेरा कलाम सूनोगी ?"

"सुनाइए ! इरशाद" चौदहवी कोरडे-पणानं म्हणाली.

मिर्जानं हसून कागद उलगडला, "तसा मी देखिल शेर करतो. पण तुम्हाला गालिबच्या कलामशी मुहब्बत आहे. मेरा कलाम तुम्हे क्या पसन्द आयेगा ?"

"जी नहीं, कां पसन्द पडणार नाही ! आप इरशाद फर्माइए !"

मिर्जा नौशानं त्या कागदातले दोन शेर ऐकवले – जे त्याने मुशायऱ्यात पेश केले होते.

"आपण त्या मुशायऱ्यात होतात ? – जो मुफ्ती सदरउद्दीन आर्जुदाकडे झाला होता ?" अचानक चौदहवीनं विचारलं.

"जी हाँ।"

"ग़ालिब होते ?" चौदहवीनं मोठ्या उत्सुकतेनं विचारलं.

"जी हाँ।" नौशा उत्तरला

"कोई उनकी गजल, या शेर, याद हो तो सुनाइए ना !"

चौदहवी अधीर उत्सुकतेनं, विनवणीच्या सुरात म्हणाली. "इस वक्त कोई याद नहीं आ रहा है।" मिर्जा दिलगिरी दाखवीत म्हणाला.

...त्याला आता मज़ाक जास्त वाढवणे योग्य वाटले नाही. त्यानं एक विडा चौदहवीच्या हातचा घेतला, खासदानात एक थैली ठेवली

* *

कोठीवरून खाली उतरत असताना, पायऱ्यांवर त्याला जमादार हशमतखाँ भेटला, मुशायऱ्यातून तो परत येत होता. हशमतखाँ त्याला पाहून थबकला. आश्चर्यात पडला. "मिर्जा नौशा ? आप... यहाँ कहाँ ?" मिर्जा गप्प राहिला.

हशमतखाँ त्याच्याकडे अर्थपूर्ण नजरेने पहात म्हणाला, "यो तो कहीए, की आपका भी इस वादी में गुजर होता है।" "फकत आज और वह भी इत्तफाक से। खुदा हाफिज।" मिर्जाने तुटक उत्तर दिले. आणि तो मेण्यात बसला.

* *

हशमतखाँला वर आलेला पहाताच, चौदहवीनं अधीरतेनं विचारलं, "ग़ालिबची ग़ज़ल आणलीत ?"

हशमतखाँला समजेना. तो गोंधळला. "लाया हूँ.... तो"

चौदहवीने अधीरतेने कागद खेचून घेतला. आता हशमतखाँला राहवले नाही. तो घसा साफ करीत म्हणाला, "पण ग़ालिब तर आता आता तुमच्या कोठीतून उतरले ! यह माजरा क्या है ?"

चौदहवी गांगरली, "ग़ालिब ? ... इथे कोठीवर..? आता-आता उतरले ? ... मुझे दिवाना बना रहे हो ! मेरा कोठा कहाँ – ग़ालिब कहाँ ?

जमादार एक एक शब्द उच्चारीत म्हणाला, "वाकई, सच कहता हूँ, हे ग़ालिब होते – आता खाली उतरले ते.

"झूठ" चौदहवी चकरावून गेली.

"नहीं चौदहवी सच कहता हूँ।"

आपले टपोरे डोळे विस्फारत हशमतखाँकडे पहात चौदहवी पुटपुटत होती, "मेरी जान की कसम, ग़ालिब थे ? झूठ .... ! मला बनवू नका ! ...अल्लाह..., खरं सांगा... ग़ालिब होते ! !

हशमतखाँ देखिल गडबडला होता. पण तो शान्तपणानं म्हणाला, "अरे, तुम्हारी जानकी कसम ग़ालिब होते. मिर्जा असद उल्लाहखाँ ग़ालिब – जे मिर्जा नौशा या नावाने मशहूर आहेत. आणि ज्यांना 'असद' देखिल म्हणतात.

चौदहवी धावतच खिडकीकडे गेली. तिने वाकून पाहिलं. पण सारा चौक शांत होता. रिकामा होता.

"हाय, मी काय करू..., ते ग़ालिब होते ... मेरा सत्यानाश हो... मैंने उनकी खातिर भी नहीं की।".....

असं म्हणून तिनं गजल लिहिलेला कागद उलगडून पाहिला. आणि कपाळावर हात मारून घेतला, " .अल्लाह, यह ख्वाब है या बेदारी...। सच ते ग़ालिब होते..., जमादार साहेब, खरंच ते ग़ालिब होते. ते जरूर ग़ालिब होते .हाय – मैंने उनको कहा, ग़ालीबकी कलाम आप क्या समझेंगे मैं मर जाऊँ ! अल्लाह.., त्यांना काय वाटलं असेल .? कसे मिठी-मिठी बातें करीत होते उफ्... ! न मालूम क्या क्या उनसे कह गयी

बोलता बोलता गज़लचा कागद तिनं तोंडावर पसरला, आणि ती रडू लागली.

आणि फिट्टनमियाँ मिटल्या डोळ्यांनी जोगिया आळवीत होता.

● ● ●




## "अंतराळाच्या अनाक्रमित आणि पवित्र मार्गावर मी पाऊल टाकले आहे...हात बाहेर काढून प्रत्यक्ष परमेश्वरालाच मी स्पर्श केला"

**सादरकर्ते : प्रा. रा. वि. सोवनी**

त्या तिकडे वर अंतराळात फक्त काळ्या पांढऱ्याचा खेळ. रंगाची वातच नाही. विश्वामध्ये आम्ही जिकडे पाहिले तिकडे हेच आणि रंग म्हणून जर कोठे असेल तर तो पृथ्वीचाच. तेथून पृथ्वीवरचे रॉयल ब्ल्यू रंगाचे सागर, तपकिरी रंगाची जमीन आणि पांढरे ढग दिसत होते. खरं म्हणजे पृथ्वी ही अंतराळातील चंद्रापेक्षा चौपट मोठी असलेली एक वस्तू होती एवढेच.

पण ह्याच वस्तूवर अपोलो आठ यानातील प्रवाशांना माहीत असलेल्या व प्रेम करीत असलेल्या जीवनाची आणि आशेची वस्ती होती. साऱ्या आकाशात विलोभनीय दिसणारी अशी ती एकच वस्तू होती. पृथ्वीवरील लोकांना ते कोणत्या आकर्षक स्थानावर राहात आहेत ह्याची कल्पना नाही. कदाचित अनेकांना तिला सोडून लांब जाणे व परत तिच्याकडे येणे ह्याचा अनुभव नाही.

चंद्राभोवती आम्ही एखाद्या सामान्य प्रवाशाप्रमाणेच वागलो. नव्याने पाहात असलेल्या जागी जसा तो वागतो तसेच आम्ही पण वागत होतो. आम्ही प्रथमच जेव्हा चंद्राच्या कक्षेत भ्रमण करू लागलो त्यावेळी असेच उतावीळ झालो होतो आणि दिसेल ते पाहाण्याचा प्रयत्न करीत होतो. "अरे ते पहा"! "अरे हे पहा" "त्या ठिकाणी काय आहे बघ" असे एकमेकाना म्हणत होतो.

आम्ही शास्त्रीय दृष्टीने जेव्हा निरीक्षण करीत होतो त्या वेळी काहीतरी अनपेक्षित दिसेल असे वाटत होते. कदाचित एखाद्या खड्ड्यात जिवंत ज्वालामुखी दिसेल असेही वाटले. पण तसे काहीच दिसले नाही. चंद्र अगदी भकास होता. आज अनंत वर्षे हा चंद्र येथे फिरत आहे त्यामुळे आतापर्यंत त्याच्या पृष्ठभागावरील अनेक कंगोरे धुपणीमुळे साफ झाले आहेत. मला वाटले की मी इतिहासातच दृष्टी टाकतो आहे. आम्ही जर अगदी जवळ–फक्त ६० मैल अंतरावर गेलो तर त्याच्या निर्मितीचे गौप्य उकलू शकू असाही विचार माझ्या मनात आला. चंद्रभूमी इतकी जवळ होती की ती आम्हाला बोलावीत होती

जेमिनी ७ आणि १२ ह्यातून झालेल्या दोन प्रवासानंतर अपोलो आठमधील अंतराळ प्रवासाची ही माझी तिसरी पाळी होती. उत्तर आफ्रिकेचा किनारा मी पृथ्वीभोवती भ्रमण करीत असताना २६६ वेळा पाहिला आहे. मला त्याचा कधीच कंटाळा आला नाही. ह्या वेळी मात्र जरा वेगळा प्रकार होता कारण पूर्वीसारखे आम्ही केवळ पृथ्वीभोवतीच भ्रमण करीत नव्हतो. आम्ही पृथ्वीपासून थेट लांब चंद्राकडे जाणार होतो, आणि ह्या प्रवासात मोठ्या मनोरंजक घटना होणार होत्या.

जेमिनी सातमधील दोन आठवड्यांचा व जेमिनी बारामधील चार दिवसांच्या प्रवासांच्या मानाने हा प्रवास तसा छोटा वाटत होता. कदाचित यानातील फरकामुळेही असे वाटले असावे. अपोलो यानात आम्ही तिघे जरी एकमेकांपासून फक्त फूटभर अंतरावर होतो तरीसुद्धा हे यान त्या मानाने मोठेच होते. आसनावरून उठून थोडेफार हिंडण्याची सोय ह्या यानात होती. खरं म्हणजे हे आकर्षण इतके जबरदस्त होते की वजनविरहित अवस्थेत रुळण्यापूर्वीच पट्टे सोडून बंधमुक्त व्हावेसे वाटत होते. ह्या उत्सुकतेमुळेच स्वैर विहार करण्यास लवकर गेल्यामुळे प्रवासाच्या सुरुवातीला आम्हा प्रवाशांना थोडासा त्रास झाला असावा.

विमानामधील सारथ्याच्या खोलीसारखे (कॉक् पिट) आमचे यान असल्यामुळे आम्ही निजलेल्या स्थितीतच ते चालविले. त्यावेळी आम्ही पृथ्वीभोवतीच भ्रमण करीत असल्यामुळे आम्हाला "वर" आणि "खाली" ह्या संवेदना (पृथ्वीसापेक्ष) नेहमीच कळत होत्या. परंतु अंतराळात वर-खाली हा भेदच नाही आणि त्याचा







अनुभव आम्हाला अपोलो यानात मिळाला. पृथ्वी इतकी लहान दिसू लागली की आम्ही "प्रवास" करीत आहोत ही भावनाच नाहीशी झाली. आमच्या शैक्षणिक काला-तील स्मृती त्यामुळे चाळविल्या गेल्या.

प्रवासाच्या सुरुवातीच्या काळात मागे पडत चाललेल्या पृथ्वीच्या दृश्याने मी भारून गेलो. फ्लॉरिडा आणि केप दिसत होते. पूर्वी मी ते पाहिले होते. पण ह्या वेळी मी पाहात असताना युनाइटेड स्टेटस्‌चा सर्व पूर्व किनारा, कॅरिबियन समुद्र आणि मध्य अमेरिका हे सगळेच एकदम दिसले. दक्षिण अमेरिका आणि जवळजवळ दक्षिण ध्रुवापर्यंतचा प्रदेश दिसत होता. अॅटलांटिक महासागर तर अंगठा आणि पहिल्या बोटाच्या अंतरात मी सामावू शकत होतो आणि पश्चिम आफ्रिकाही दिसत होती. हे सर्व एकाच वेळी दिसत होते. आज-पर्यंत पृथ्वीपासून इतक्या लांब अंतरावर गेलेले आम्हीच पहिले मानव होतो.

अनेक स्मृती माझ्यापुढे तरळत होत्या. वजनरहित अवस्थेतील तेच वास, तीच दृश्ये आणि त्याच भावना परत येत होत्या. मोकळ्या जागेत कोठेही वस्तू "ठेवावी" आणि जरूर लागेल तेव्हा ती तेथून काढून घेता यावी हाही अनुभव नवा नव्हता. अंतराळ प्रवासाचे आकर्षणच असे आहे की तो पुन्हा पुन्हा करावा असे वाटते. परत एकदा प्रवास करावा असे सारखे वाटत राहाते.

## केवळ सुदैवानेच समावेश

अपोलो आठमधील प्रवाशांच्या यादीत प्रथम माझे नाव नव्हते. माईक कॉलिन्सचा मी खरा पाठीराखा होतो. त्याला काहीतरी दुखापत झाल्यामुळे मी त्याची जागा घेतली होती. मला तर हा प्रवास करण्याची इच्छा होती पण माईकची जागा घेऊन तो करावा असे कधीच मला वाटले नाही. माईक हा प्रवास करण्यास समर्थ होता आणि त्याची इच्छाही होती. व त्यामुळेच तो ह्या प्रवासा-कडे डोळे लावून बसला होता. मी त्याची जागा घेतल्यावर प्रवासाची सारी योज-नाच बदलली. चांद्रयानासकट आम्ही आता पृथ्वी प्रदक्षिणा घालणार नव्हतो. आम्ही चंद्रावर जाणार होतो.

ह्या नव्या योजनेचा मी जो जो विचार करू लागलो तो तो ती मला अधिक पटू लागली. चंद्रावर जाण्याची ती प्रचंड झेप आम्ही घेऊ शकू. त्यामुळे आमच्या नंतर येणाऱ्या प्रवाशांचा मार्ग अधिक सोपा होईल. ह्या प्रवासाच्या योजनेला परिचित झाल्यावर ह्यापूर्वीच अपोलो योजनेत ही कल्पना आम्ही कां तयार केली नाही ह्याचे मला आश्चर्य वाटले.

अचानक ती योजना साकार झाली– आमच्या प्रस्थानाचा दिवस जवळ आला. आमच्या प्रशिक्षणाला एक वेगळीच धार आणि वेग आला. अंतराळ प्रवासातील यान चालविणे मला अगदी नवीन होते. जेमिनी प्रवासात सारथ्याचे कौशल्य फारसे नव्हते. नियंत्रण केंद्राने आमच्या प्रवास मार्गाची आखणी अचूक व पुरेपूर केली होती, त्यामुळे यानाचे नियंत्रण अगदी क्षुल्लक होते.

अपोलो हे जरा वेगळ्या धाटणीचे यान आहे. यानातून चंद्राच्या जवळ तर जाव-याचे पण त्याच्यावर जाऊन धडक मारा-वयाची नाही आणि शिवाय त्याला वळसा घालून पृथ्वीकडे परत यावयाचे ही मुख्य उद्दिष्टे त्या यानासाठी निश्चित केली होती. चंद्रावर जाण्याचा मार्ग (ट्रॅजेक्टोरी) वराच लांब असतो आणि त्यामुळे त्याच्या गणितात जरी क्षुल्लक चूक झाली तरी अंतराच्या लांब पल्ल्यामुळे ती फार मोठी होते. म्हणूनच ह्या यानाच्या प्रवास मार्गावर आणि चालविण्यावर अतिशय काळजीपूर्वक लक्ष ठेवावे लागते.

नॅसा संघटनेच्या निर्णयाप्रमाणे पर-तीच्या प्रवासासाठी यानातच नियंत्रणाची व्यवस्था करण्यात आली. चन्द्राकडे जाण्याचे वेळी यानाचे नियंत्रण प्रामुख्याने पृथ्वीवरील केंद्राकडे राहील. ह्या निर्ण-याला अर्थातच महत्त्व होते. कारण चंद्रा-कडे होणाऱ्या प्रवासावर त्यांचे लक्ष राहील

## जिम लोवेल



व काय करावयास पाहिजे ह्याच्या सूचना ते आम्हाला देऊ शकतील. यदाकदाचित चंद्राकडे जाताना आमचा नियंत्रण केंद्राशी संपर्क तुटला किंवा काही कारणाने आम्ही मध्येच परत येण्याचे ठरविले तर यान पृथ्वीकडे परतवून नेण्याची यंत्रणा यानात तयार होती. चंद्राकडे जाऊन त्याला एक वळसा घालून तसेच परत पृथ्वीकडे येण्याचे साधनही आमच्या जवळ होते.

परतीच्या प्रवासाच्या वेळी यानातील यंत्रणा फार महत्त्वाची ठरते. अंतराळ अफाट आहे. पण पृथ्वीच्या वातावरणात प्रवेश करण्याचा सुरक्षित पट्टा फक्त दोन अंशाचाच आहे. आम्ही तो पट्टा बरोबर पकडला पाहिजे. त्यासाठी पृथ्वीच्या आणि चंद्राच्या क्षितिजावर दिसणाऱ्या ताऱ्यांचे मार्गदर्शन घेतले पाहिजे. त्यावरून तुम्ही यानाची पृथ्वीसापेक्ष स्थिती आणि वेग अजमावू शकता. पृथ्वीवरील नियंत्रण केंद्रात आमच्या यानाची स्थिती व वेग साऱ्या प्रवासात पाहिले जात होते. आम्ही सुद्धा त्यांची गणिते यानात करीतच होतो.

## जणु तारकांचाच पाऊस

चंद्राच्या दिशेने आम्ही निघाल्यावर एस चार बी ह्या तिसऱ्या टप्प्याच्या





अनुक्रमणिका

अग्निबाणाच्या कार्यावर लक्ष ठेवणे ही माझी पहिली जबावदारी होती. त्यातून जळून बाहेर पडणारे इंधन अमाप होते आणि त्या इंधनाचे गोठलेले वर्फासारखे असंख्य कण भोवती पसरत होते. मी यानाचे नियंत्रण करावे असे ठरले होते पण हे स्फटिक प्रखर ताऱ्यांप्रमाणे चमकत होते. त्यामुळे खरे तारे कोणते हेच मला निश्चित करता येईना. सगळेच तारे अस्थिर वाटत होते. ताऱ्यांची हिमवृष्टीच होत आहे असे वाटले.

चंद्र प्रदक्षिणेला जरूर असणारे अग्नि-वाण प्रज्वलित करण्यात आमचा घामटचा निघाला. ते ज्वलन योग्य काल झाले नसते तर आम्ही चंद्राभोवती वेडेवाकडे भरकटत राहिलो असतो. आम्ही जेव्हा आमचे सारे लक्ष त्या घटनेकडे केंद्रित केले होते त्यावेळी वास्तविक आम्ही म्हणत होतो "वसुंधरे ! आम्ही तुला सोडून जात आहोत. आम्ही चन्द्राच्या आकर्षणात ओढले जात आहोत आणि परतीचे वेळी जर ते इंजिन नीट प्रज्वलित झाले नाही तर आम्ही कायमचे चंद्रावरच राहाणार आहोत".

आम्ही चंद्र प्रदक्षिणा घातल्या आणि तेथून परतही निघालो. चंद्राभोवती फिरत असताना चंद्रभूमीचे नकाशे नीट पाहून भावी आगमन स्थानांवर प्रकाश कितपत आहे ह्याची पाहाणी करणे हे माझे मह-त्वाचे काम होते. हे काम विशेष कठीण वाटले नाही; पण एवढे खरे की पृथ्वी-कडील चंद्राच्या पृष्ठभागाचे काम (जरी त्यापैकी काही भागावरच सूर्य प्रकाश होता) विरुद्ध बाजूच्या पृष्ठभागापेक्षा मला अधिक सोपे वाटले. प्रथम मी मेसि-अर खड्डा पाहिला आणि नंतर अधिक अभ्यासाने परिचित असलेला पिकरिंग खड्डा पाहिला. दक्षिणेकडील पायरेनीज पर्वत रांगा पुढे दिसल्या आणि ट्रॅन्क्विलिटी समुद्रातील भावी आगमन स्थान आमच्या संपूर्ण दृष्टीस पडले. माझ्या मताप्रमाणे पूर्व दोन हे स्थानच उतरण्यास योग्य आहे असे कळविण्यात मला आनंद होत आहे.

संपूर्ण प्रवासात दळणवळण मला आश्चर्य-चकित करण्याइतके उत्कृष्ट राहिले. दुसरी कोणतीही अडचण आली नाही तरी चंद्र प्रदक्षिणेच्या वेळी संपर्क साध-नेत अडचण येईल असे मला वाटत होते; पण ती अडचण आलीच नाही. चंद्राचे पृथ्वी-पासूनचे अंतर वरेच असल्यामुळे आम्हाला संदेश मिळण्यास १.३ सेकंद अधिक वेळ लागत असे. त्यामुळे यानातील टीव्ही कॅमेरे पृथ्वीकडे प्रक्षेपण करण्यासाठी वळवून ठेवण्यास आम्हाला थोडासा त्रास पडला. केवळ १ ३ सेकंदाच्या उशीरा-मुळेच आम्हाला कॅमेरे वळविण्यास नेमका तेवढाच वेळ अधिक लागत असे.

परतीच्या प्रवासासाठी प्रज्वलित केलेला अग्निवाण हे खरोखरीच पाहाण्यासारखे दृश्य होते. घरी परतण्याची कल्पनाच मोठी सुखावह होती. घरी परत येताना मार्ग दुरुस्ती तीन वेळा करण्याचे योजले होते पण आम्हाला फक्त एकदाच दुरुस्ती करावी लागली. चंद्राच्या कक्षेतून वाहेर पडल्यावरोवर आम्ही ती दुरुस्ती केली. यानातील यंत्रणेचे आणि ती तयार कर-णाऱ्या तंत्रज्ञांचे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे. चन्द्राच्या पाठीमागे असताना आम्ही ते एंजिन प्रज्वलित केले आणि त्याने आपले कार्य इतके चोख बजाविले की साऱ्या परतीच्या प्रवासात आम्ही फक्त सेकंदाला पाच फूट एवढीच दुरुस्ती केली.

## जूल व्हर्नचे 'कोलंबियाड'

जूल व्हर्नबद्दल मी विचार करीत होतो. माझ्या लाहन वयात त्याच्या पुस्तकांनी मला भुरळ पाडली होती. त्याच्याच पुस्त-कातील वर्णन मी प्रत्यक्षात आणीन असे मला स्वप्नातसुद्धा वाटले नव्हते. व्हर्नच्या "पृथ्वीकडून चंद्राकडे" ह्या पुस्तकात

अपोलो आठने केलेल्या घटनांसारख्या विलक्षण घटना सांगितल्या आहेत. त्याच्या अंतराळ प्रवास यानात तीनच प्रवासी होते. फ्लॉरिडा येथून ते लोक डिसेंबरमध्येच चंद्रप्रवासाला निघाले आणि ते प्रवासी प्रशांत महासागरातच परतले. आमच्या यानाला गती देणाऱ्या शनि-अग्निबाणाला 'कोलंबियाड' हे नाव द्यावयाचे माझ्या मनात होते. कारण जूल व्हर्नने ज्या तोफेतून चंद्र प्रवाशांना पाठविले त्या तोफेचे नाव 'कोलंबियाड' हे होते.

व्हर्नच्या पुस्तकात एक गंमत आहे. पहिल्या पुस्तकात त्याने प्रवाशांना चंद्राच्या गुरुत्वाकर्षणातच गुंतवून ठेवले होते. ते प्रवासी कायमचेच चंद्रावर राहाणार होते. परंतु वाचकांनी ह्या घटनेला एवढा जोराचा विरोध केला की, व्हर्नने नंतर लिहिलेल्या पुस्तकात प्रवाशांना परत पृथ्वीवर आणले. त्याला काय वाटले असेल ह्याची कल्पना मला आहे. माझ्या पत्नीने नेमके व्हर्नचे पहिले पुस्तकच वाचले होते आणि ती गोष्ट यथेच संपत नाही हे तिला पटविण्यास मला फार सायास पडले.

आता मी घरी परतलो आहे आणि खरोखरीच चंद्रावर जाऊन आलो ह्यावर विश्वासच बसत नाही. चंद्र विलक्षण आकर्षक आहे. तसा तो आक्रमक दिसतो पण तरीसुद्धा असे वाटते की तेथे जाऊन भूत काळाच्या आवरणाखालचे पाहावे
तेथे जाऊन प्रत्यक्ष पाहाणे फार महत्त्वाचे आहे.

अंतराळ प्रवास सहन करता यावा यासाठीच सध्याच्या योजना राबविल्या जात आहेत. चंद्रावर जाण्यात ह्या योजनांची कसोटी आपण घेत आहोत. चंद्र हा अंतराळ प्रवासासाठी एक उपयुक्त स्थानक ठरणार आहे.

माझ्यानंतर जे लोक चंद्र प्रवास करणार आहेत त्यांना मी थोडासा सल्ला देऊ इच्छितो. इतक्या लांब अंतरावरून चंद्र आणि पृथ्वी ह्यांची सापेक्षता बदलते पण हे ग्रह-उपग्रह मात्र आहेत तसेच राहातात. चंद्रावरून इतर ग्रह पृथ्वीवरल्या सारखेच फार लांब, जवळ किंवा वेगळे वाटत नाहीत. ते आहेत तसेच दिसतात. प्रवासातले हे दीपस्तंभ अचल आहेत.

प्रवासाला निघण्यापूर्वी माझ्या शाळेतील इंग्रजीच्या शिक्षकांचे (मिस क्लार्कचे) मला पत्र आले होते. दुसऱ्या महायुद्धात एका कॅनेडियन वैमानिकाने लिहिलेल्या कवितेच्या ओळी तिने मला लिहून पाठविल्या होत्या. त्या ओळी सर्व प्रवासात माझ्याबरोबर होत्या आणि मी त्यांचाच विचार करीत होतो. मला वाटते त्या ओळीत माझाच अनुभव सांगण्यात आला आहे. "अंतराळाच्या अनाक्रमित व पवित्र मार्गावर मी पाऊल टाकले आहे. हात बाहेर काढून प्रत्यक्ष परमेश्वराला मी स्पर्श केला......"

● ● ●












# हृदयाचे गाणे

लुई फरनाण्डिस

अर्ध जागृतीतच रुमाच्या कानावर स्वराची मंद मृदु मुलायम धार पाझरत राहिली. चपापून ती उठली. तिला वाटलेच ...आपण स्वप्नातच ते स्वर ऐकले. तो स्वर वापूंचाच! परंतु... तिने आशेच्या डोळ्यांनी आजुबाजूला पाहिले. वापू तिला दिसले नाहीत. उदास ढग डोळ्यात तरंगले. आता ते कुठले दिसायला? कालच तर...

आवाजाच्या रोखाने ती हळुहळू चालू लागली... नि दारातच ती चमकून थांवली. तिचे लक्ष समोर गेले. वापूंचा फोटो समईच्या मंद प्रकाशात उजळला होता. ते मोहक डोळे... अनंताचे सौंदर्य शोधणारे. ते गालीचे हास्य.. गुलाव कळीच्या पाकळ्या अलगद उलगडताहेत.. तसे ओठ. पूर्वस्मृतीची पाखरे गतकाळाच्या पिंजऱ्यातून निसटली. ती पकडण्याचा चाळा तिचे मन करीत राहिले.

* *

सारंगी वाजवता वाजवता वापूंच्या हातचा वो किंचित गोंधळला नि एकदम थांवला. त्यांचे चित्त विचलीत झाले. पहाटेच्या गारव्यातून प्राजक्त पुष्पांचा मंद मधुर गंध चोर पावलांनी वायुझुळकेची वोटे पकडून येत होता. पाखराना जाग येत होती. झाडपेड कलरवाने भरून होते.

पण..

आपण ऐकला तो स्वर...

त्यांनी लक्षपूर्वक ऐकले. हातातल्या सारंगीकडे पाहिले. वो त्यांनी हातावेगळा केला. समोरच त्यांची पत्नी रुमा वसली होती. तिने त्यांना प्रश्न केला,

'कां..?'

'मी स्वर ऐकला... या सारंगीच्या स्वरात एकजीव झालेला.'

रुमा हसली. कौतुकाची कमळे नेत्रात उमलली.

'कोण ग?'

'प्रीता

'रडतीय?'

'अं–हं! तुमच्या सारंगीबरोवर स्वर उठवतीय ती!'

वापू हसले. काहीतरी गवसल्याचा आनंद त्यांच्या चर्येवर उजळला.

'ही माझा स्वर नक्कीच पकडणार..'

रुमाने नुसतेच मुग्ध हास्य करून त्यांच्याकडे पाहिले. अन् ते सारंगीला गवसणी घालीत आहेतसे वघून तिने विचारले,

'रियाज संपला?'

'जो स्वर ऐकला... तोच स्वर मला या सारंगीतून उमटवता येणार नाही... निदान या क्षणी तरी!'

सारंगी होती त्या जागी त्यांनी ठेवली व ते वाहेर आले. उगवतीच्या उदरातून उजळलेल्या उषेची किरणे कणाकणानी सरकत होती. धरती ती अनंत करांनी वेचीत होती. प्रकाशाच्या उघड्या जवड्यात काळोख रिचला जात होता अन् उनाची ऊब वाढत चालली होती. सुगंध



अनुक्रमणिका

हृदय गुदमरवीत होता नि स्वरांचा नाद मनाला विळखीत होता.

ते हळुहळू आतल्या खोलीकडे गेले. ते स्वर आता थांबले होते. जो आकार त्यांनी पकडला होता तो धुक्यासारखा वितळत गेला होता.

बापूंनी सारंगी वाजविण्याचे थांबवले आहे हे प्रीताला जरा उशीराच कळले होते. कळले त्या क्षणी तिला दाराशी बापूंची मूर्ती उभी असलेली दिसत होती. ती चमकली. आपल्या स्वरांमुळेच त्यांच्या रियाजमध्ये व्यत्यय आला असावा. पण त्यांची चर्या प्रेमळ पित्याचीच तिला दिसली. सूर्य किरणांची बोटे अंगाला स्पर्श करताच थंडीची थरथरती मिठी निसटावी नि प्राजक्त गंधाने धुंदावलेली वायू झुळूक चैतन्याची मुलायम शाल सर्वांगी लपेटून जावी . . तसे तिला वाटले. तरीपण आपल्या पित्याचे अंतःकरण धुंडाळून बघावे म्हणून ती त्यांच्याकडे बघत राहिला.

'रियाज संपला का, बापू ?'

'हो . . .

' फार लौकर . . . '

'मनात आलं . . . .

'काय ? बरं नाही ?'

'वाजवता वाजवता सारंगीच्या स्वरांबरोबर तरंगते स्वर . . . ऐकले मी. '

'मी . . . मी

'सारंगीचे की माणसाचे, हा भ्रम उत्पन्न व्हावा . . .'

'मीच ते स्वर . . .

'सारंगीचे स्वर शरमले त्याने, प्रीता.'

प्रीता टकमक त्यांच्याकडे पाहता पाहता शरमली. खाली मान घालून ती अपराधी स्वरात उदगारली,

'गेला महिनाभर मी तुमच्या सारंगी बरोबर स्वर लावतेय. आजही . . .'

'पण त्याकडे ध्यान नव्हते माझे. आजच पाहिलं . . मिळणाऱ्या मान सन्मानाने, पैशाने मी इतका कधीच संतुष्ट झालो नव्हतो. पण तुझा आताचा स्वर ऐकून . . . कुबेराचे भांडार लाभावे तसा आनंद माझ्या काळजात भरला, पोरी. आज मला माझा

**. . . मी आवाज ऐकला . . . माझा आवाज ऐकला मी . . . माझा मीच तो ऐकला . . . माझ्या हृदयाचा आवाज . . . हृदयानेच ऐकला . . . मी कृतार्थ झालो . . .**

स्वर मिळाला. तो स्वर राखला पाहिजे, पोसला पाहिजे, वहराला आणला पाहिजे.'

प्रीता गप्प गप्पच होती. बापू काय म्हणत आहेत हे जाणण्याचे तिचे वय नव्हते. अवघे दहा वर्षाचे वय तिचे. परंतु ते अतिशय खुषीत आहेत . . . आपल्या स्वरांमुळेच त्यांना इतका आनंद झाला आहे, याची तिला खात्री वाटली नि तिची चर्या चंद्रविकासी पंकजासारखी विकसली.

'प्रीता, उद्यापासून पहाटे उठायचे. माझा तंबोरा घ्यायचा. गाणे म्हणायचे. मी तुला गाणे शिकवणार आहे'.

प्रीताचा आनंद हृदयात मावेना. तिच्या मनात आले . . . फुलपाखरासारखे बागडावे. पाखरासारखे भरारत जावे. वाऱ्यासारखे सोसावत पळावे. निर्झरासारखे खळाळत धावावे. परंतु ती जागच्या जागीच स्तब्ध उभी होती. टकटक त्यांच्याकडे बघत होती. ते मोहक डोळे . . . अनंताचे सौंदर्य शोधणारे. त्यांचा अद्भूत स्वर . . . अनंताला गवसणी घालणारा. त्यांच्या गायनाने रंगलेल्या धुंद रात्री . . . तिने थोड्या फार पाहिल्या होत्या. पण तिला त्याचे नीटसे आकलन झाले नव्हते. आपले बापू फार सुंदर गाणे म्हणतात . . लोक त्यात धुंद होतात . . . त्यांना भरपूर बिदागी देतात . . . हे तिला माहीत होते

त्यांच्याच प्रमाणे आपणही आवाज उठवावा. स्वर घुमवावा . . . अनंताला गवसणी घालावी. लोकांना धुंद करावे. पैसा मिळवावा . . . कित्येक दिवसांची तिची मनीषा. . . तिला वाटायचे बापूंना सांगायचे, 'बापू, गाणे शिकवा मला'. पण तिने तसे कधीच सांगितले नाही. आपण अगदी लहान. अन् बापू केवढे मोठे. . कसे सांगायचे नि त्यांना तरी ते कसे काय रुचायचे ? हसतील. चेष्टा करतील. 'वेडी.. वेडी. . . ' म्हणतील.

परंतु आज तिला न विचारताच भाग्य लाभले होते. जो आकार ती शोधीत होती.. तोच आकार तिला शोधीत तिच्या जवळ आला होता.

* *

'प्रीता ऽ ऽ'

'अं. झोपेतच प्रीता कुरकुरली. प्रीता ऽ ऽ ऽ ऊठ ऽ ऽ'

'अं अं कुशीवर वळता वळता ती पुटपुटली.

'प्रीता ऽ ऽ ऽ जरा तीव्र स्वरातच बापूंनी तिला साद घातली.

'कशाला तिला उठवता या वेळी ?' जागी झालेली रुमा उद्गारली.

'मी तिला गाणे शिकविणार आहे आजपासून.'

'यावेळी ?'

'कां ?'

'थंडी कोण पडलीय् . . .' अंग शिरशिरवीतच रुमा म्हणाली.

'थंडी, ग्रीष्म, वर्षा . . . गायकाला विचारात घेता येत नाही. ज्याला शिकायचे आहे त्याने थंडी वाऱ्याची, ऊनातापाची पावसापाण्याची कदर करता कामा नये कधी. काळावेळाचेही भान ऊरता कामा नये. जीवन मरणाचीसुद्धा क्षिति तिथे उपयोगाची नाही. प्रीता ऽऽ प्रीता ऽऽऽ'

प्रीता उठली. डोळे चोळीत राहिली. तिच्या डोळ्यांवर निद्रेची नशा होती. स्वप्नाची हळुवार फुंकर होती.

'अग, गाणे शिकायचेय् ना तुला ?'

'हो ऽ ऽ' असा हेल काढून उद्गारत ती एकदम उठून उभी राहिली. तिची झोप विरघळत गेली.

तिने तोंड धुतले व ती बापूंसमोर येऊन उभी राहिली.

'चल . . . देवाला नमस्कार कर . . .'

तिने देवाला नमस्कार केला. बापूंना केला. रुमाला केला.



अनुक्रमणिका






'तो तंबोरा घे...'

तिने तंबोरा घेतला. बैठक मारली. तंबोरा घेवून बैठकीत कसे बसतात ते तिने वरेचदा पाहिले होते. बापू कसे बसतात ते तिला पूर्ण ठाऊक होते. त्यांच्या प्रमाणे तिने आपली बैठक घेतली. बापूंनी आपला तंबोरा घेतला नि तिच्या समोरच त्यांनी आपली बैठक मारली. तारावर तर्जनीचे नखाग्र हलकेच ओढले. निघालेल्या स्वरांवर तिचे मन तरंगत गेले नि एकदम शहारले. त्यांनी हास्य करून तिच्याकडे पाहिले. अन् मग त्यांनी तिला शिकवायला सुरुवात केली.

बापू त्यात दंग झाले. प्रीता त्यात रंगली. रुमा त्यात रमली. अन् तो कार्यक्रम दररोज दीड-दोन तास चालू लागला.

बापूंचा त्यावेळी ऐश्वर्याचा काळ होता. कसलीच कमतरता नव्हती. पण कलावंताचे जीवन लहरी, नादी. त्यांना जे मित्र लाभले होते ते व्यसनात पूर्णपणे लोळणारे नि दुसऱ्यांना लोळविणारे. त्यांच्या नादी बापू लागले ते रुमाला बिलकूल रुचले नाही. अन् दिवसेंदिवस त्यांच्या वार्ता ऐकून रुमाला अगदी रहावले नाही.

'आताशा रंग वराच चढतो बैठकीना..'

'सुरांचा रंगच तसा –'

'सुरांचा नव्हे... सुरेचा.'

'अं..'

'पण या सुरेच्या रंगात सूर गमावणार तुम्ही.'

'पण..पण –'

'काही बोलू नका. आज सुरावर जीवन चाललेय् तुमचे... सुरेवर नाही.'

'पण मी

'तुमच्या पैशांनी आज पीत नसाल; पण उद्या तुमचेच पैसे त्या पाण्यात बुडतील.'

'अग, कधीतरी

'पण कां ?'

'चार जाणती, प्रतिष्ठित माणसे आग्रह करतात

'दारू पिणारी माणसे जाणती नि प्रतिष्ठित ?'

'जग तसे मानते त्यांना.'

रुमा हसली. पण गतीशून्य सरोवरा सारखे तिचे हृदय झाले.

'मी तुमची पत्नी सांगणे माझे कर्तव्य. ऐकणे तुमचे कर्तव्य. ऐकलेत तर ऐश्वर्य राखाल. नाहीतर असलेलेही राख कराल.'

बापू काही बोलले नाहीत.

अन् असेच काही दिवस गेले होते. पण त्यांच्या वर्तनात तिळाचाही फरक झाला नव्हता. अन् ते नाटक कंपनी काढण्याच्या विचारात आहेत असे तिला कळले त्यावेळी तिच्या अस्वस्थतेत आणखीच भर पडली होती.

एक दिवस न राहवून ती त्यांना म्हणाली,

'नाटक कंपनीचे ऐकतेय् मी

'खरंय् ते नेहमीच्या पद्धतीने पण शांत स्वरात बापू उदगारले, 'रंगभूमीची सेवा करावी... आपली कला खालच्या थरापर्यंत पोचवायला रंगभूमीसारखे दुसरे साधनच नाही, रुमा. अन् पैसाही भरपूर मिळतो त्यात. शिवाय चांगली गुणी माणसे जवळ येतात '

'गुणाने गुण उजळले जातील की असलेले उधळले जातील हाच प्रश्न !' असे म्हणताना तिचे मन भवितव्यतेच्या काळोख्या गुहेत चाचपडत शिरण्याचा प्रयत्न करीत होते.

अन् तिला जे भय वाटत होते ते नष्ट होण्यासारखीच परिस्थिती नंतरच्या तीन चार वर्षात निर्माण होत गेली होती. रुक्ष वाळवंटात हिरवळ उगवत गेली होती. बापूंची नाटक कंपनी चांगलाच पैसा कमवीत होती. बापूंचे नाव लहानथोरांच्या तोंडी मुखी झाले होते. वृत्तपत्रे त्यांच्यावर स्तुती सुमनांचा वर्षाव करीत होती. रुमालाही मग वाटले की आपला नवरा म्हणत होता तेच खरे ठरले. तिचा सुवर्ण सुवर्णाने झळाळू लागला. घरात नोकर चाकर, मोलकरणी वावरू लागल्या. सुताची नाती पाळेमुळे पक्की करू लागली. दोन्ही वेळी तीस एक मंडळीची पंगत बसू उठू लागली. पक्वान्नाच्या नाना तऱ्हा थाळचात दिसू लागल्या.

बापूंचा मान म्हणजे राजाचा सन्मानच जणू, असे प्रीताला वाटत होते. अभिमानानेच ती बापूंकड पाहत होती. तिच हृदय संतोषाने काठोकाठ भरत होते... जणू नदीचे श्रावण मासातले पात्रच !

परंतु तिच्या नेहमीच्या रियाजमध्ये कधी खंड पडला नाही.

* *

राजकारणातले सूर आणि 'आ'सूर




'यंग टर्कां'ची आणि अर्थमंत्र्यांची पुन्हा एकदा वाजली

अन् रुमा नको नको म्हणत असतानाही बापूंनी आपला हट्ट कायम ठेवला. एका चित्रपटात त्यांनी आपली सगळी मिळविलेली मिळकत घातली. आणखी कुणाकुणाचे कर्जही घेतले. जाहिरातीची खैरात केली नि अखेर तो बोलपट आदळला. हत्तीच्या पावलानी आलेले वैभव हत्तीच्याच पावलांखाली सापडले. वैभवाचा राजवाडा वैफल्याच्या वाऱ्या वादळात उडाला. घातली घडी विस्कटली. नाटकातून कामे करणारी माणसे भराभर दूर सरली. सामानसुमान लिलावात फुंकले गेले. मित्र दूर झाले. आप्त तोंडे लपवू लागले. सुताची नाती खुंटावरले कावळे ठरली. ज्या जागी मेजवान्या झडत तिथे साधे मांजरही फिरकेनासे झाले. जिथे स्वरांच्या सागराला उधाण येत होते तिथे रुमाच्या आसवांना पूर येत होता व तिची तीच तो पाहत होती, त्यातून वाहत जात होती.

बापू बाहेर बाहेरच फिरत होते. सगळ्यांपासून दूर दूर राहात होते. काळोख पडल्यावरच ते घराच्या पायऱ्या चढत होते. पुढ्यात ठेवलेले गुपचूप गिळीत होते. ओले, सुके, जाडे, भरडे, करडे, कोरडे, घशात लोटताना त्यांचा जीव कासावीस होत होता. अन् कधी कधी न खाता पिताच ते अंथरुणावर पडत होते. दाटलेल्या काळोखात . . . त्यांच्याही देहाचा एक काळा कण . . . विरून जिरून जात होता.

रुमाला आपले दुःख आवरून सावरून धरताना अतिशय प्रयास पडत होते. कधी तिला ते मोकळे करता येत होते, कधी मोकळे करता येत नव्हते नि मनमोकळे कुणाशी बोलताही येत नव्हते. त्यांचे गाण्याकडे दुर्लक्ष झाले आहे हे तिला कळत होते. पण त्याबद्दल ती ब्रही काढत नव्हती. मात्र एकच गोष्ट नेहमी न चुकता घडत होती . . . प्रीताला ते नियमित पहाटे उठवीत. गाणे शिकवीत. त्या क्षणी त्यांचे नेत्र काहीतरी शोधीत प्रीताच्या मुखावर अडळ होत. परंतु त्यांना हवे असणारे सापडत नव्हते . . नि त्यांची धुंदी तशीच वाढत राहत होती. त्या धुंदीतच ते वावरत होते. वेड्यासारखे दूर दूर राहात होते.

'कसला विचार करता आता ?'

'भिकाऱ्याच्या मागून कुत्री फिरतात. पण माझ्यामागून ती सुद्धा फिरत नाहीत. केवढे दुर्दैव तरी माझे !'

'हाती होते ते घालवलेत. संभाळता तर . . .'

'कलावंताचे स्वप्न . . . फुलते त्यावेळी कुबेर लाजेने आपले भरले भांडार लपवून ठेवतो. भंगते त्यावेळी दरिद्री नारायण त्याला आपले फुटके भांडे दाखवतो.'

रुमाने आपला खालचा अधर गच्च





अनुक्रमणिका



भिमसेन जोशी

**हिमनगाची उत्तुंग शिखरं तुडवून**
**महादेवाची कुडी हादरविणार**
**तुझा मेघनाद**
**गंगोत्री होऊन**
**दगडगोट्यांवर खुळखुळ वाहूं लागतो**
**तेव्हा तुझ्या बाबुलमोराची**
**फूलपाकळ्यावरली मखमली**
**लव कुरवाळते**
**आमच्या रोमांचांचे अग्र.**

**— शरद मंत्री**

आवळून धरला. हृदयात उठला, उफाळला उमाळा तिने कसा वसा आवरला. ती रुद्ध स्वरात म्हणाली,

'आता गळ्यात आहे ते तरी संभाळा...'

'तुझ्या– ?'

'अं–हं . . . आपल्या ! –तो आवाज. तो स्वर संभाळा . . . म्हणजे पोटाची तरी चिंता करायला नको.'

'माझी उमेद खचली, रुमा. कसले गाणे . . . कसले गाणे म्हणू मी ? ज्या सुरांना मी आळवले . . ज्या सुरांमुळे मी सुखाने जीवन जगलो . . . ते सूर मी कसे आळवू आता ?'

'मित्रांच्या नादी लागलात . . . येतात तरी का ते जवळ आता ? त्यावेळी मित्रांपेक्षा विचार जवळ करता तर . .'

'मित्रांमुळे काय झाले ?'

'मित्रांनी गुण उधळले. तुम्ही ते उजळले. आता मित्र गेले . . पण गुण तसेच उरले.'

अस्वस्थ हृदयाप्रमाणेच अस्वस्थ नेत्र वळवळले. पण ते काहीच बोलले नाहीत. निःश्वासाचे वारे वावटळीच्या वेगाने सुटले.

'कलेची पुष्पे फुलतात . . जीवन वृक्षावर. पण त्या जीवन–वृक्षाची पाळेमुळे ज्या भूमीत असतात ती भूमी तुम्ही विसरलात. अन् आज . आमचे डोळ्यातले अश्रू बघायला कुणाचेही डोळे वळत नाहीत. हृदये वळवळत नाहीत.'

'अग, कसली चिंता करतीयस तू ? तूच म्हणतीयस गळा संभाळा. माझा गळा आहे . . .'

'तो मुक्त करा.'

परंतु त्यांनी त्याकडेही दुर्लक्ष केले होते. विचाराच्या सहाणेवर विफलतेचे निःश्वास झरत, झिजत होते. कलावंताचे मन म्हणजे प्राजक्ताची पुष्पे. जीवनाच्या वाऱ्या–वादळात ती टिकाव धरीत नाहीत. कोसळतात. कोमेजतात . . नि त्याच क्षणी त्याचे खरे जीवन जन्म घेते. प्राजक्त फुलांनी भरतो रात्रीचा. रिक्त होतो सकाळचा. पण जो दरवळ भरलेला असतो तो वातावरणाला चटकन् सोडीत नाही.

बापूंना आपल्या जीवनाची आशा वाटत नव्हती. आताशा ते घरातच असत. मनासारखेच त्यांचे शरीरही खंगत, झिजत चालले होते. प्रीता कुठेतरी गाण्याच्या कार्यक्रमाला जात होती. जे काय हातावर पडत होते ते ती आपल्या आजीच्या हातावर ठेवीत होती.

एक दिवस बापू अतिशय अस्वस्थ झाले होते. आपल्या जीवनाचे क्षण आता फार राहिले नाहीतसे त्यांना कळून आले होते. प्रीताला जे शिकवायचे होते ते अर्धवटच राहिल्याचे शल्य शरासारखे सतत टोचत राहिले होते. त्यांनी रुमाला प्रश्न केला,

'प्रीता कुठे आहे ग ?'

'कां ?'

'बोलीव तिला इथे.'

'प्रीता ऽ ऽ' रुमाने साद घातली.

हाकेसरशी प्रीता तिथे आली.

'प्रीता, तू आळवलेली सुरावट आठवणीत आहे ना तुझ्या ?'

'हो . . .'

'जुन्या पटकुरांची कलापूर्ण गोधडी करते संसारी स्त्री. मिळालेल्या सुरावटीला सुन्दर साज चढवून ऐकवतो खरा गायक.' बोलता बोलता त्यांचे डोळे पाण्याने डबडबले. गालावरून अश्रू ओघळत सरकले. ते मग म्हणाले, 'प्रीता, तुला खूपखूप शिकवायचे होते माझ्या मनात; पण दैव तसे घडवू शकत नाही. इच्छा मनाची . . शक्ती देहाची. इच्छा फुलते नि शक्ती झिजते. पोरी, ते कोपऱ्यात दिसतायत दोन तंबोरे. . . . तेवढीच माझी अशी दौलत. यावेगळे देण्यासारखे दुसरे काहीच नाही माझ्याकडे.'

प्रीताने बापूंना एकदम मिठी आवळली.

'बापू ऽ ऽ'

तिच्या डोळ्यातल्या आसवांनी त्यांची छाती भिजली.

'पोरी, अश्रू गाळू नकोस. माझ्या डोळ्यातून अश्रू आले ते माझ्या संपलेल्या वैभवाच्या वेदनेचे. तुझ्या येतात ते वैफल्याच्या वणव्याचे. कल्पना आहे मला त्याची. पण तुझ्या डोळ्यात अश्रू येता कामा नयेत. स्वरांची सम्राज्ञी अश्रू गाळीत नसते. . . . अश्रू गाळीत असते स्वरात धुंद झालेल्यांचे. माझ्या स्वराचा वारसा . श्रद्धेने संभाळ जोपास नि वाढीव . . . ही इच्छा माझी–'

'बापू, तुम्ही जीवनाची आशा सोडता ? धीर सोडू नका. धीराने जगा.'

'कसली आशा नि कसला धीर . .

'मी आहे . . .'

'होय . . . आशा नि धीर . . तितकाच ! पण मन वेडे. वेड्यावाकड्या वळणा वळणाच्या वाटांनी वावरते !'

'बापू, जीवनाची आस सोडू नका.'







अनुक्रमणिका

'समईतले तेल संपले आहे. फक्त त्यातली वात ओली आहे. काडीने वात पुढे पुढे किती म्हणून सारीत तेवत ठेवशील, पोरी? काडीही त्यामुळे जळून जाईल.' असे म्हणून त्यानी उशीवर आपले डोके ठेवले व ते तोंड वळवून स्वस्थ पडले.

त्या दिवशी बापूंना अतिशय अस्वस्थ-पणा वाटत होता. थकल्यासारखेही वाटत होते.

'प्रीता कुठे ग ?'

रुमाला त्यांचा प्रश्न जरा विचित्रच वाटला.

'तिचे आज आकाशवाणीवर गाणे आहे ना ?'

'होय. . . . माझे स्वप्न आकाराला येतेय् परंतु तो आकार पूर्ण पाहण्याआधीच मी

'काय बोलता विचित्रच !'

शब्दांनी घटना घडत नाही नि बिघडतही नाही. होणारे होणारच ! सुरावर गाणारा सुद्धा वदसुरात गातो कधी कधी लोकाना कळले नसले तरी त्या गायकाला कळतेच.

'आता स्वस्थ पडता का ?'

'स्वस्थ ?' क्षीण हसून ते म्हणाले, 'छे : छे : ! मी प्रीताचे गाणे ऐकणार . . . ऐकणार नि नंतरच अर्धवटच वाक्य टाकून ते एकदम थांबले. अन् मग आवे-गानेच म्हणाले, 'कित्येक दिवसांची मनीषा माझी . . तिच्या गाण्याचा कार्यक्रम आकाश-वाणीवर व्हावा . . . . तिच्या आवाजाने आभाळ व्यापावे, धरती वेढावी . . गेली ना ती . . ?'

'मघाच ! तुमचा आशीर्वाद घेऊन गेली ती. . .'

'मला आठवतच नाही ते . . .'

काही वेळाने रेडिओवर गाणे चालू झाले.

धुंद क्षण कधी संपले, बापूंना कळलेच नाही.

'अग, आवाज ऐकला . . . . माझा आवाज . . ऐकला मी . . माझा मीच तो ऐकला. माझ्या प्रीताचा आवाज . . माझ्या हृदयाचा आवाज . . . हृदयानेच ऐकला.'

रुमा स्वतःशीच पुटपुटली,

'मी सुद्धा ऐकला तो.'

बापू नंतर डोळे मिटून स्वस्थ पडले. त्यांच्या चर्येवर मंद हास्य विलसत होते. बऱ्याच दिवसांनी ती त्यांचे तसले हास्य बघत होती – त्यांच्या अंगावरले पांघरूण तिने नीट केले व ती तशीच त्यांच्या मुखा-कडे पाहत राहिली . आयुष्यात हरवलेली उमेद ती शोधीत राहिली. .

*

प्रीता रेडिओ स्टेशनच्या बाहेर आली. दाराशीच शेजारचा रामदास तिला दिला. त्याचे मुख म्लान दिसत होते. डोळ्यातल्या तेजाची विझली टिंबे तिला भयाण वाटली... तेल संपलेल्या समईच्या ज्योतीच तिला दिसल्या.

'काय रे ?'

'प्रीता. इतकेच म्हणून तो एकदम स्तब्ध झाला.

'अरे, असा स्तब्ध कां ? काय झालंय् ?'

'बापू.....बापू—बापूंना....'

तिचा श्वास एकदम कोंडला अन् मग तो हळुहळू सुटला. अधिक शब्दांची तिला आव-श्यकता भासली नाही. ती रेडिओ स्टेशन-कडे येण्यापूर्वी बापूंकडे गेली होती. तिने प्रथम आपल्या कुल दैवताला नमस्कार केला होता. मग ती बापूंच्या अंथरुणापाशी गेली होती. त्यांच्या पावलाना स्पर्श करून ती म्हणाली होती,

'बापू, मी रेडिओ स्टेशनवर जातेय....'

त्यांनी आपले नेत्र तिच्या मुखावर रोखले होते. आटलेल्या विहिरीच्या बुडाला असलेल्या टीचभर खळगीतले उरलेसुरले पाणी सूर्य किरण पडून चमकावे तसे डोळे चमकले होते. ते खोल आवाजात उद्गारले होते,

'जा. माझ्या सदिच्छा तुझ्या पाठीशी सावलीसारख्या. स्वराचा सागर बनवू नकोस वादळी. सरोवरच बनीव... संथ, प्रशांत असं. त्यात तुझ्या रागदारीची धवल पद्मे डौलाने डोलावीत. स्वरांचे हंस विहरत राहावेत. जा. आमची कुल-देवता तुला संभाळील. तुझ्या स्वरांना आकार देईल. तिला कधीच विसरू नको तू. त्यांचे बोलके ओठ मुके झाले नि मुके डोळे बोलके झाले. बोलक्या डोळ्या-तले मिटले भाव मिटले ओठ उलगडून शब्दात उमटले नाहीत.

अन् मग त्यांचे ओठ हालत राहिले. डोळे मिटले. डोळ्यातून अश्रू आले. ते तिने आपल्या बोटांनी टिपले. तीच ओली बोटे तिने आपल्या मस्तकी लावली. त्यांची मूर्ती डोळे भरून बघावी म्हणून ती पाहात राहिली. पण भरल्या डोळ्यांना ती चिता-डल्या चित्रासारखीच दिसली. भरले डोळे, भरले अंतःकरण घेऊन ती घराच्या पायऱ्या उतरली होती.

**राजकारणातला ' बंदसूर '**




**आंदोलनापेवजी विकास कार्यक्रमावर आमचा विश्वास आहे असे मा. वसंतराव नाईक म्हणाले.**






## सामगायन (१)

मित्रा, काय वर्णू तिची सुकुमारता ! फूल हातात घेण्यासाठी तिने एकदा जरी त्याच्याकडे नजर टाकली, तरी लगेच तिच्या हाताच्या बोटांवर लाली चढते; आता तुझ्या पायाला अळव्याचा रंग लावू असे म्हणावयाचा अवकाश की तिच्या पायाचे तळवे रक्तवर्ण होऊन जातात; आणि आपल्या अंगाला चंदनादीचे लेप द्यावयाचे आहेत याची नुसती आठवण जरी झाली तरी ती श्रमाने पार थकून जाते. फार काय सांगू ? केस सुगंधित करणे देखील तिला शिरी धोंडा घेण्याप्रमाणे असह्य होते.

> **आघ्रातुं सकृवीक्षितेऽपि कुसुमे हस्ताग्रमालोहितं**
> **लाक्षारंजनवार्तयापि सहसा रक्तं तलं पादयोः ।**
> **अंगनामन् लेपनस्मरणमप्यस्यन्तखेदावहं**
> **हन्ताऽधीरदृशः किमन्यदलकामोदोऽपि भारायते ॥**

–'सहृदय'

आता ती आठवण तीव्रतेने झाली होती. काहीतरी घडले जाणार असे तिला वाटले होते. त्या घडणाऱ्या घटनेची तिला नीटशी कल्पना नव्हती. पण आता. . . .

ती चालू लागली. पाय लटलटत होते. तसे ती दाखवीत नव्हती. तिचे हृदय असंख्य सुयांनी टोचले जात होते. परंतु वेदनेची सूक्ष्मही रेखा ती आपल्या मुद्रेवर उमटू देत नव्हती. मनात म्हणत होती. . . . इथेच कळलेय् ते ठीक झाले. घराकडे जाई-पर्यंत तरी हृदयाला सावरून आवरून बळ-कट करता येईल. प्रत्यक्ष त्यावेळी तिथे असते, तर. . . . तो धक्का आपले हृदय सावरू शकले नसते.'

घराजवळ माणसांची वर्दळ चालू होती. ती तशीच आत गेली. रुमाने तिला पाहिले. आकांताने ती उद्गारली,

'पोरी, फुटलं ग दैव आमचं !'

प्रीता थरथरलीच. थरथरत्या पावलांनीच ती वापूंच्या शवाजवळ गेली. 'बापू.... बापू.... !' इतकेच शब्द तिच्या मुखातून अस्फुटपणे बाहेर निघाले.... नि तिचे ऊर हादरत राहिले. ओठ हालले. आवंढे गिळले....नि भरले डोळे गळत राहिले. आक्रंदाला आवाज नव्हता. भावनांना आकार नव्हता. आसवांना खळ नव्हता. तिला बोलायचे होते. आपले दुःख शब्दातून मोकळे करायचे होते. बापूंबद्दलचे प्रेम तिला मुक्त करायचे होते. भावना व्यक्त करा-यच्या होत्या. परंतु ते सगळे मोकळे होत होते शब्दांनी नाही. . . . अश्रूंनी. तेच डोळ्यातून भरभरून त्यांच्या पायांवर वाहवीत ती राहिली.

* *

पहाटे प्रीता दचकूनच जागी झाली.

बापू तिच्याजवळ आले होते. तिच्या मस्तकावरून हळुवार हात फिरवीत म्हणाले होते,

'प्रीता, ऊठ....रियाजाची वेळ झालीय्.'

ती उठली. तोंड धुतले. अन् तशीच ती बापूंच्या रिक्त जागेकडे पाहत राहिली. त्या जागी समई पेटत होती. बापू होते... धीर होता. आधार होता. बळ होते. आता.... आई नि–कसे जीवन घालवायचे ?

'पोरी, कसला विचार करतीयस ग ? जीवनाचा ? स्वरांची स्वामीनी तू.... ते सूर संभाळ. सुरांना मुक्त कर. तेच तुला सगळे काही देतील. नि प्रीता, हृदयाचेच गाणे गा.... ते गाणे प्रत्येकाच्या हृदयाला भिडले पाहिजे. हर्षाने ओलावले पाहिजेत डोळे. दुःखाने पाझरले पाहिजेत डोळे. सौख्याने भरले पाहिजे हृदय. समाधानाने डोलले पाहिजे प्रत्येकाचे मस्तक. असेच तू गा.... हृदयाचे गाणे गा...प्रीता, हृदयाचे गाणे गा......! '

तिचे बापूंच्या फोटोकडे लक्ष गेले..... तो फोटो तिने भिंतीवरून खाली उतरवला. समईच्या बाजूला भिंतीला लावून ठेवला चौरंग मांडला. त्यावर बापूंच्या पादुका ठेवल्या. अंगणातल्या प्राजक्ताची फुले वेचून आणली... त्या पादुकांना वाहिली. उदबत्त्या पेटवून ठेवल्या व तिने नमस्कार केला. कुल-दैवताला नमस्कार करून तिने तंबोरा घेतला. बैठक मारली. तंबोऱ्याची तार छेडली.... नि तिच्या डोळ्यांना धार लागली.

'बापू... बापू... प्रीताचे गाणे... रंगणार कसे ? हृदयाचे गाणे घुमणार कसे ? हृदयाचे गाणे हृदयातच ऐकणारे हृदय तुमचे जवळ नाही. जवळ तुमची पावले नाहीत. पायीच्या पादुका आहेत. तुमच्या देहाचा आकार नाही. आहे केवळ छाया ! मी चुकले तर चूक दाखविणारे आहे कोण जवळ ? किती घाई केलीत... किती घाई केलीत जाण्याची... बापू, घाई केलीत....'

अन् तिने तंबोऱ्याची तार छेडली. गाण्याला सुरुवात केली. त्यातच ती रमली. धुंद झाली.

ते स्वर ऐकून रुमाचे मन गतकाळात शिरले होते. कैक आठवणी तिच्या डोळ्या-समोरून झरझरा गेल्या होत्या. त्या आठ-वणी तिला एका वेगळ्याच जगात घेऊन गेल्या. अन् ती जे शोधत होती ते मिळाल्या-सारखे वाटले. तिने आपले डोळे मिटले.... त्या गाण्यात ती धुंद झाली. अन्

प्रीताचे गाणे थांबले. तिच्या हातातल्या तंबोऱ्यावर काही तरी ठिबकले... पाण्याचे थेंब..... ? प्रीताने चमकूनच वर पाहिले.

'आई...' इतकेच म्हणून ती उठली. आईला तिने मिठी आवळली. ती सकंप आवाजात उद्गारली, 'आई, रडू नकोस.... रडू नकोस ग !'

'नाही रडत, प्रीता, नाही रडत.'

'मग हे अश्रू. . . '

'अश्रू . . . त्यांच्या उणीवेचे नव्हत. त्यांची उणीव मला कधीच भासणार नाही. फक्त तू जवळ हवीस. तुझ्या आवाजाने त्यांचा आकार जवळ आला. तुझ्या आका-रात त्यांचा आवाज उठला, पोरी, ते गेले नाहीत. ते आहेत. . . .ते आहेत... तुझ्या हृदयात तुझ्या हृदयाचे गाणे... तोच आवाज. त्यांचाच तो आवाज....मला वैभवासारखा आहे. न संपणाऱ्या वैभवा-सारखे माझ्या प्रीताचे गाणे रंगेल नि... हे मिळणारे सौख्य आम्हाला चंद्रासारखे आहे. सूर्यासारखे दुःख सोसायला बळ देणारे आहे. ● ● ●

अनुक्रमणिका






# रंगल्या रात्री अशा....




## सुरांचा महापूर

१९५६ सालची ही कथा आहे. जुलै महिन्यात कल्याणला तुफान पावसाने झोडपले होते आणि पावसाच्या नि खाडीच्या पाण्याने कल्याण वेढले गेले होते. एका शनिवारी पं. बडे गुलाम अली यांच्या गायनाचा कार्यक्रम जाहीर झाला होता आणि त्या आधी गुरु-शुक्रवारी तुफान पाऊस होऊन कल्याणात होड्या चालू झाल्या होत्या. या प्रकारामुळे शनिवारचा कार्यक्रम होणार नाही हे जवळजवळ ठरल्यासारखेच होते; पण शनिवारी पाऊस कमी झाला नि पाणीही ओसरू लागले. आधी ठरल्याप्रमाणे खाँसाहेब कल्याणात आपल्या शागीर्दांसह येऊन दाखलही झाले. कल्याण गायन समाजाच्या प्रशस्त सभागृहात गायन शौकिनांची संख्या फारच थोडी होती; कारण आज मेहफिल होणार नाही असाच सर्वांचा कयास होता; पण खाँसाहेबांनी गायला सुरुवात केली आणि ती बातमी कर्णोपकर्णी सर्वत्र पसरली. पहिली चीज पुरी होण्याच्या आधीच सभागृह तुडुंब भरले आणि नव्याने येणाऱ्या श्रोत्यांची दुसऱ्या मजल्यावरच्या वसंत हॉलमध्ये व्यवस्था करावी लागली. खाँसाहेबांनी त्या रात्री बैठक अशी रंगविली की आधीच्या दोन दिवसात पावसाच्या महापुराने हैराण झालेले कल्याणकर खाँसाहेबांच्या मिठ्या सुरांच्या महापुरात आनंदाने डुंबू लागले. रात्री २ वाजता खाँसाहेबांनी भैरवी आळवून बैठक रीतसर संपविली; पण श्रोते उठायलाच तयार नव्हते. त्यांची जिद्द पाहून खाँसाहेबही खुषीत आले आणि बैठक पुन्हा सुरू झाली; पहाटे चार वाजेपर्यंत खाँसाहेब खूप गायले.

खाँसाहेब आणि त्यांचा सर्व लवाजमा यांची विश्रांतीची सोय वसंत हॉलमध्ये बिछायती टाकून केली होती. तेथे जाऊन ते झोपले. सकाळी ९ वाजता ते उठले. बिछायतीवर बसल्याबसल्या आजुबाजूला तंबोरे, तबले-डग्गे, इत्यादि हत्यारे त्यांना दिसली. त्यांनी आपल्या शागीर्दाला एक तानपुरा आणायला सांगितला आणि त्याच्या खुंट्या पिळून तो सुरात जुळवला. त्याच्या जुवारीदार सुरात खाँसाहेबांनी सहज म्हणून षड्ज लावला आणि पाहता पाहता पुन्हा बैठकीला सुरुवात झाली. तोपर्यंत पन्नास साठ श्रोतेही उपस्थित झाले आणि तीही मैफल दुपारी एकपर्यंत रंगली. कल्याणात आलेला हा सुरांचा महापूर शौकिनांच्या कायमचा लक्षात राहिला आहे.

## फक्त चहापानाच बरं का !

पं. बडे गुलामअली खाँसाहेब यांच्या गाण्याचे एक शौकीन गृहस्थ दादरच्या हिंदू कॉलनीत राहतात. ते स्वतः गवई नाहीत, पण गाणी ऐकण्याचा त्यांचा षौक विलक्षण आहे. त्यातल्यात्यात बडे गुलामअली खाँ यांचे गाणे तर त्यांच्या फारच आवडीचे होते. मुंबईत अगर आसपास कुठेही त्यांचा कार्यक्रम असला की ते तेथे हटकून हजर असायचे. खाँसाहेबांनी आपल्या घरी एकदा यावे आणि गावे अशी त्यांची फार फार इच्छा होती; पण हे जुळावे कसे? कारण खाँसाहेबांच्या बैठकीना ते हजर राहात तरी त्यांची अजून प्रत्यक्ष ओळख झाली नव्हती, कुणी करून दिली नव्हती. त्यांनी आपली ही इच्छा अनेक मध्यस्थांच्या कानी घातली, पण खाँसाहेबांना तसे सुचविण्याचे धाडस करणार कोण? शेवटी त्या गृहस्थांनी खाँसाहेबांचीच भेट घेण्याचे ठरविले आणि एकदा ते त्याप्रमाणे भेटलेही. अनेक बैठकांना हजर राहिल्यामुळे त्यांचा चेहेरा खाँसाहेबांच्या ओळखीचा होता. त्यांनी चहापानाचे आमंत्रण दिले, ते स्वीकारताना खाँसाहेबांनी सांगितले की अमुक एका दिवशी संध्याकाळी आपण अवश्य चहापानाला येऊ, पण फार वेळ थांबणार मात्र नाही.

ठरल्याप्रमाणे खाँसाहेब हिंदु कॉलनीत त्या गृहस्थांच्या घरी येऊन दाखल झाले. त्या गृहस्थांनी मोठ्या चतुराईने तानपुरा, तबला-डग्गा, सारंगी इत्यादि हत्यारे बैठकीत तयार ठेवली होती. गप्पागोष्टींबरोबर खाँसाहेबांचे चहापान झाले आणि त्यांनी सहज म्हणून तानपुऱ्याच्या तारा छेडल्या. त्या गृहस्थांची युक्ती फळाला आली आणि खाँसाहेबांनी चीज सुरू केली. केवळ चहापानासाठी आलेला तो थोर कलावंत दोन तास गाऊनच तेथून परतला. त्या गृहस्थांना अर्थातच धन्यता वाटली.

## मॅजिस्ट्रेटला चपराक

कल्याण गायन समाजात घडलेला हा एक किस्सा आहे. सध्याच्या एका नामवंत गायिकेची आई त्यावेळी गाण्याच्या बैठकी करीत असे. बैठकीत आदा करून गाणे म्हणायचे अशी त्यांची पद्धत होती. कल्याण गायन समाजात अशी एक बैठक चालू असता ठाण्याचे एक गान-शौकिन मॅजिस्ट्रेट पुढेच बसले होते. त्यांनी रंगात येऊन काही अश्लील सूचना केली; त्याबरोबर बाई संतापल्या आणि 'ही गाण्याची बैठक आहे, तमाशा नव्हे' असे परखड शब्दात बजावून मॅजिस्ट्रेट साहेबांना 'गेट आऊट' म्हणून फटकारले. भर बैठकीत झालेला हा अपमान मॅजिस्ट्रेटना सहन झाला नाही. ते आपल्या अधिकाराचा बागुलबोवा दाखवून 'ही बैठक आत्ताच्या आत्ता बंद पाडण्याची सत्ता आपल्या हाती आहे' असे ते तावातावाने म्हणू लागले; पण बाईंनी त्यांच्या धमकावण्यांना दाद दिली नाही. शेवटी काही जाणकारांनी मध्यस्थी करून ते प्रकरण मिटवले आणि गाणे पुढे चालू झाले. मध्ये काही घडलेच नाही अशाप्रकारे बाईंनीही शेवटपर्यंत बैठक रंगविली.

—कृ. वि. पेठे





अनुक्रमणिका

# पुरबचे खलिफा
## उस्ताद अमीर हुसेन खाँ

— अरविंद मुळगावकर

उत्साह आणि अखंड कार्यमग्नतेचं मूर्तिमंत प्रतीक असलेली जुनाट कल्याण बिल्डिंग. अठरापगड जातींचे व नानाविध धंदे करणारे, तसंच एकमेकांच्या गलिच्छपणाची सवय झालेले लोक आज वर्षानुवर्षे येथे राहत आले आहेत. भल्या पहाटेपासून मध्यरात्रीपर्यंत ते निखळ श्रम करतात. विविध प्रकारचे वास आणि आवाज ह्या दोन्ही गोष्टी कल्याण बिल्डिंगमध्ये प्रकर्षाने आढळतात मुख्य जिन्याने वर गेलात तर प्रत्येक मजल्यावर शिरताना नाक दाबूनच आत जावं लागेल. सकाळी दहा अकराच्या सुमारास निरनिराळ्या ठिकाणाहून तळलेल्या मासळीचा, खमंग बिर्याणीचा तर राईच्या तेलातल्या तळणाचा वास सुटलेला असेल. मधूनच कुठून तरी उदबत्त्यांचा घमघमाट येईल. तळमजल्यावरून चर्मकारांनी चामडं टोकताना काढलेला विशिष्ट प्रकारचा आवाज, वारवाल्यांच्या ॲल्युमिनीयमच्या टोकनांचा किणकिणाट, संध्याकाळी चाँदच्या आगमनानंतर समोरच्या मशिदीतून ऐकू येणारी 'आलान', कॅथॉलिक ख्रिश्चनांची कोंकणीतून वेळप्रसंगी होणारी खर्जतारस्वरातील प्रार्थना, तर दरवर्षी एकेक इयत्ता वाढविणाऱ्या प्राथमिक शाळेतल्या चिमण्यांचा चिवचिवाट. ह्या आवाजांव्यतिरिक्त आणखीही काही मधुर आवाज – आवाज म्हणण्यापेक्षा सूर ह्या गोंगाटात सामील झालेले असतात. दुसऱ्या माळ्यावरील उस्तादखान्यातून आलेले तबल्यावरचे निनाद ! ह्या उस्तादखान्यातून भारतीय संगीतातले अनेक अतिरथी महारथी तयार होऊन बाहेर पडले आहेत. त्यांची कला उस्तादखान्यातील भिंती भिंतीने हृदयाशी जपून ठेवलेली आहे. ह्या खोलीवरून पुढे जाताना तुम्ही जर आत डोकावलात तर कोपऱ्यातील एका छोटयाशा बैठकीवर एका खानदानी नजरेशी तुमची नजर होईल. एक मामुली बनियन, निळ्या हिरव्या चौकडीची

'मौलाना' ब्रॅंड तेहमत–अशा साध्या वेषात दिसणाऱ्या ह्या व्यक्तीच्या नजरेत तुम्हाला अनेक दुर्मिळ भाव एकत्र आलेले आढळतील. दुर्दम्य आत्मविश्वास, सुसाट धावणारी काव्यप्रतिभा, तपश्चर्येचं तेज, प्रेम आणि करुणा ह्यांचा तो अपूर्व मिलाफ असेल.

पण नाही.... आज ह्या क्षणाला हे शक्य नाही. आज हे मी काय पाहतोय ? काय ऐकतोय ?

"सलाम आलेकूम अरविंदभैय्या"–इस्माईल फुलवाल्याचे परिचयाचे शब्द तेच, पण त्याच्या चेहऱ्यावर नेहमीचं स्मित हास्य नाही. त्याचा हसरा चेहरा कोमेजलाय. चांभारांच्या ठोकाठोकीची लय विघडलीय. समोरच्या मशिदीतून होणाऱ्या 'आलानी'चा आवाज कापरा भासतोय. कारण फक्त एकच. बाबा, तुम्ही आम्हाला सोडून गेलात. असे अचानक जाणार होतात तर एवढी माया कां लावलीत ?

"दिग्ननान धितिरकिटतक तकीटधीकीट धीतीटता गदीगन...." ही तुम्ही रचलेली व मुनीरखाँसाहेबांनी वाखाणलेली लाजवाब गतपरन – दीपचंदीच्या थाटातली. ही शिकवून झाल्यावर "जाओ, अब घर जाओ और रियाझ करो" असं तुटक वागणं कां नाही ठेवलंत ? लहानग्या बाळाला सांगाव्या तशा गोष्टी कां सांगत वसलात ? तुम्ही सांगितलेल्या साध्यासुध्या गोष्टींमध्येसुद्धा किती मोठं तत्त्वज्ञान सामावलेलं असायचं ! काहीही सांगताना तुमची बोलण्याची लकब इतकी वेहत्तिन होती की कुणीही स्वतःला विसरून जावं. मालाडसारख्या लांबवरून येणाऱ्या शागीर्दासाठी तुम्ही सतत चोवीस तास स्वतःला कोंडून घेतलंत.

एकोणीसशे पंचावन्न सालचा मे महिना. माझा कुणीतरी करून दिलेला समज–खाँसाहेब उत्तम शिकवतात पण गंडाबंधनाला हजारबाराशेवर पाणी सोडायला कुणीही तयार असलं पाहिजे. दामूने मला खाँसाहेबांकडे नेलं. तो म्हणाला, "अरविंद मी आता काहीच सांगत नाही. तू खाँसाहेबांना एकदा भेटच." पहिल्या भेटीतच माझा समज किती गैर होता हे मला कळलं. आणि गंडाबंधनात मी फक्त सव्वाशे रुपये खर्च केले.

विद्या देण्यात तुम्ही कधीही हात आखडता घेतला नाही. एकदा तुम्हाला कळलं की आपण दिलेल्या बंदिशांचा हा योग्य रीतीने रियाझ करून मान ठेवतो, की झालं. कुणालाही तुमचं अफाट ज्ञानभांडार खुलं होतं. ती एखादी मियाँ शलारी खाँसाहेबांची गतपरन असो, मियाँ हाजीसाहेबांची पुरानी चक्रधार असो अथवा तुम्ही स्वतः बनवलेली एखादी अप्रतिम कविता असो. तुम्ही ती कधीही कुणापासून लपवून ठेवली नाही. कारण तुमचा आत्मविश्वास वाघासारखा जबरा होता. आणि मन आभाळाएवढं मोठं होतं. शिकवण्याची तुमची हातोटी पण विलक्षण होती. एकदा तुम्ही मला मियाँ हाजीसाहेबांची–"धगत्तकीट धातिरकिटतक्तेत्...." ही "गेंदकी उछाल" गतपरन याद करायला दिली होतीत. मुळातच उठावदार असणारी ही गतपरन तुमच्या हातातून तर लाजवाब वाजत होती. बाजूलाच बसलेल्या एका शागिर्दालाही ती आवडली. त्याच्या चेहऱ्यावरील भावांवरून तुम्ही ते जाणलं. आणि म्हणालात–"बेटे तू भी याद कर" परंतु त्याच्या हातातून ती निघेना. क्षणार्धात तशाच प्रकारची पण

**......अब मेरी कोई ख्वाईश बाकी नही; बहोत नाम कमाया, पैसा भी कमाया, अच्छे और सच्चे शागीर्द मिले, मैं मुझे बहोत तकदीरवाला समझता हूँ**

आसान बोलांची गतपरन तुम्ही तयार करून त्याला दिलीत. आणि ती चांगली वाजल्यावर त्याच्या चेहऱ्यावरचे आनंदाचे भाव न्याहाळण्यात तुम्ही दंग झालात.

घुमटकर हाऊसमध्ये रंगलेली मेहफील. मरहूम उस्ताद हबीबउद्दीन खाँसाहेबांचा तबला. त्यावेळी त्यांनी तुमच्याविषयी काढलेले उद्गार किती सार्थ होते ! ते म्हणाले "मैंने आजतक बहोतसे मशहूर तबलिये दिये लेकिन अमीर हुसेन जैसा एकही है–जो अच्छा बजायक है, बतायक है और बनायक भी है." काही कलाकार उत्तमोत्तम चिजा–बंदिशा बांधणारे असतात–काही त्या उत्तम रीतीने शिकवू शकतात तर काही वाजवू शकतात. पण तुमच्यात ह्या तिन्ही गोष्टी सारख्याच उच्च दर्जाच्या होत्या. केवळ ह्याच कारणांसाठी मुनीरखाँसाहेबांनी खलिफा पदाची गादी तुम्हालाच चालवण्यास दिली. पुण्याला स्व. सवाई गंधर्वांची पुण्यतिथी होती. आदले दिवशीच थिरखवाँखाँसाहेबांचा तबला झाला होता. आणि दुसरे दिवशी तुमचं तबलावादन उद्घोषित करण्यात आलं होतं. रसिकांची नेत्रा गर्दी उडाली होती–आणि तुमचा तबला एखाद्या रियाजी जवानालाही लाजवील इतका दमदार आणि खणखणीत झाला. बराचसा 'पुराना' तबला व अधून मधून तुम्ही स्वतः केलेल्या बंदिशांची पखरण त्यामुळे एक आगळाच रंग तुम्ही भरलात. तुम्ही गुंग होऊन वाजवत होतात उस्ताद मुनीर खाँसाहेबांची एक छोटीशीच गत–"धाकिटतक् तक्धींऽ तक्तक्धीं तक्तक्तक् तिरकिटतक् तिरकिटतक् तक् धीं
बोटं विजेच्या चापल्याने तबल्यावरून फिरत होती. बायांची गूंज कानाकानात घुमून राहिली होती. गत एकदा वाजली.– "दुबारा बजाइएगा" कुणीतरी श्रोत्याने फर्माईश केली. दुसऱ्यांदा गत वाजली आणि उस्ताद अहंमदजान थिरखवाँ उठून स्टेजवर आले.––

"वाह् भाई वाह्, अमीर तूने तो कमालही कर दी. माशाअल्लाह् ! ये लो नजर हमारी तरफसे' असं म्हणून शेरवानीच्या खिशातून निघतील तितक्या नोटा काढून त्यांनी तुमच्या हातात कोंबल्या. तुम्हालाही गहिवरून आलं. आजपर्यंत ह्या गृहस्थाने आपल्याला जाहीररीत्या कधीही मानलं नाही. आणि हा आज स्वतःहून नजर देतोय–म्हणजेच खलिफापदाचा मान ! तुम्ही सर्वांना लागलीच सांगितलंत–'देखिये,, आजतक भाई अहंमदजानने तुझे नजर नही दी. ये पहली बार है–लेकिन मैं तबलेकी सौगन खाकर कहता हूँ–इसके बाद मै इनसे कभी नज़र नहीं लूँगा. अहंमदजान डोळे पुसत पुसत आपल्या जागेवर जाऊन बसले आणि तबला पुन्हा सुरू झाला.

रियाझ करण्यातली तुमची जिद्द वाखाणण्यासारखी होती. तुम्हीच कधीतरी सांगितलेला तो प्रसंग अजूनही डोळ्यासमोर






असल्यासारखा वाटतो. त्यावेळी तुम्ही खूपच तरुण म्हणजे अठरा–एकोणीस वर्षांचे होतात. मुनीरखाँसाहेब कधीकाळी हैदराबादला येत तेव्हा तुम्हाला काहीतरी शिकायला मिळे. त्यानंतर महिनेन् महिने कंटाळवाणे जात. हैदराबादेत एकदा दिल्लीचे मशहूर तबलानवाझ नथ्थूखाँसाहेब यांचा तबला झाला. तुम्ही दिल्ली बाजातल्या दोन-बोटी कायद्यांनी भारावून गेलात. नथ्थूखाँसाहेब दुसऱ्या गावी निघून गेले तरी त्यांचे दोनबोटी कायदे तुमच्या कानात गुंजत राहिले. आपणसुद्धा दोन बोटांचे कायदे तयार वाजवावे असं तुम्हाला वाटू लागलं आणि "धातिरकिटतक् धिरधिरधिरधिरकिटतक् तिरकिट..." हा दोनबोटी कायदा घोटण्यास सुरुवात केली. रोजचा अठरा तासांचा रियाझ. तुमच्या अब्बांनी–अहंमदबक्ष खाँसाहेबांनी–आपल्या मुलाचा हा प्रयत्न पाहिला; त्यावेळी ते एक ओझरता शेरा मारून गेले–"बेटे, कौआ चलने लगा हंसीकी चाल और खुदकी भी खो गया" पण तुम्ही त्याकडे दुर्लक्ष केलंत. त्यानंतर दोन एक वर्षांनी नथ्थूखाँसाहेब पुन्हा हैदराबादेत आले. आणि योगायोगाने एका मेहफलीस तुमच्या तबल्याने सुरुवात झाली. थोडाच तबला असा काही जोरदार वाजला की नथ्थूखाँसाहेबांसकट सर्वजण चकित झाले. अखेरीस तुम्ही तो ठेवणीतला कायदा काढलात. "धातिरकिटतक् धिरधिर... एकपटीतली लय जरा जास्तच वाटली. सर्वांना वाटलं आता चौपट करताना नम्मेवाल्याला डोळा मारून लय खेचून घेणार.... पण झालं वेगळंच. बघता बघता कायदा चौपटीत चढला. एवढ्या वरच्या मंझीलवरसुद्धा बोटं लीलेने फिरू लागली. मुष्कीलतेच्या भावाची एखादी बारीकशी सुरकुतीसुद्धा चेहऱ्यावर उमटली नाही. आणि कोपऱ्यात बसलेले नथ्थूखाँसाहेब उठून पुढे आले "ओह् ओह्.. बेटे, क्या उंगलियाँ पायी है....बहोत खूब....काफी रियाझ कर लिया है...." असं म्हणून त्यांनी तुमच्या हाताचं चुंबन घेतलं..... जवळच बसलेले तुमचे पिताजी तुमच्याकडे पाहत मिष्किलपणे हसले. ते हसणं मार्मिक होतं !

तुम्हाला किती विविध गोष्टींमध्ये रस वाटायचा ! लहानपणी हैदराबादेत पतंगबाजीत तुमचा हात क्वचितच् कुणीतरी धरला असेल. तुमचा धाकटा भाऊ पहिलवान. त्याच्याकडून तुम्ही कुस्तीचे अनेक डावपेच शिकून घेतलेत. शरीर कमावलंत. भरगच्च 'सीन्या'ने तटतटलेल्या शेरवानीतला तुमचा तो तरुणपणीचा फोटो पाहिला की तुम्ही केलेल्या मेहनतीची कल्पना येते. कुराण, रामायण, महाभारत, तसंच कित्येक उर्दू ऐतिहासिक ग्रंथ तुम्ही वाचून काढलेले आहेत. एखादा इंग्रजी चित्रपट असो, मराठी नाटक असो किंवा उर्दू मुशायरा असो. प्रत्येक वेळी खूप रस घेऊन तुम्ही हे कार्यक्रम पहायचात. हैदराबादेत असताना मुहर्रमच्या ताबुताच्या मिरवणुकीत तुम्ही अनेक वेळा ताशा वाजवला आहे.

तुम्ही तबला शिकण्यास मुनीरखाँसाहेबांकडे आलात तो किस्सा तर मजेदारच आहे. हैदराबादेतील गोष्ट. एका मेहफिलीस तुम्ही अब्बाजानबरोबर हजर राहिला होतात. वय असेल काहीतरी चौदा-पंधरा वर्षांचं. पण तुमच्या कपड्यांचा थाट काही औरच होता. एखाद्या नबाबालाही लाजवील असा. कांजी केलेला लखनवी कुडता, त्याला सोन्याची बटनं, ब्लेजरची शेरवानी, डोक्यावर रामपुरी टोपी व पायात पंप शूज. पिताजींनी तुम्हाला आपादमस्तक न्याहाळलं व म्हणाले–"इसके साथ साथ अगर अच्छा तबला बजा लेते तो क्या बहार आ जाती" ..त्यांचा हा टोमणा तुम्हाला मेहफिलभर सतावत राहिला. आणि दुसरे दिवशी पहाटेच तावातावाने तुम्ही घर सोडलंत. कुणालाही न सांगता. तडक मुंबईला पळून आलात. मुनीरखाँसाहेबांनी ओळखलं की स्वारी पळून आलेली आहे. त्यांनी हैदराबादला तार ठोकली. "बच्चे की खैरियत. मेरे पास भाग आया है. अब मेरे पासही रहेगा." अशा तऱ्हेने तुम्ही त्यांच्याकडे शिकण्यास सुरुवात केली. अब्दुल रेहमान व तुम्ही रात्रभर रियाझ करायचात नि सकाळी उठून सौदा आणून पंधरा सोळा लोकांचं जेवण तयार करायचात. अशा खडतर तपश्चर्येने तुम्ही विद्या हासिल केलीत.

त्यावेळी तुम्ही व तुमचा तबला ऐन उमेदीत होता. एक दिवस अचानक तुम्हाला मुनीरखाँसाहेबांची तार आली रायगढहून. त्यांनी तावडतोब येण्यास सांगितलं होतं. रायगढच्या नबाबास तबल्याचा दांडगा शौक. हिंदुस्थानातले अनेक उत्तमोत्तम तबलिये आपल्या गुणांचं चीज करून घेण्यास जमले होते. दरबार रोज भरायचा व रोज एकेक जण आपली हाजिरी लावून जायचा. त्याच्या योग्यतेनुरूप त्याला तनखा मिळायचा. तुम्हीसुद्धा रोज दरबारात हजर राहून अनेकांचे तबले ऐकलेत. एक दिवस नबाबसाहेबांचं लक्ष तुमच्याकडे गेलं. त्यांनी मुनीरखाँसाहेबांना विचारलं, "ये कौन पहिलवान हररोज यहाँ आ जाता हैं"–"हुजूर ये मेरा भतिजा है. अच्छा तबला बजाता हे इसलिये मैंनेही उसे बुलवा लिया"– "अच्छी बात ! तो आज हम इन्हें सुन लेंगे" आणि त्या दिवसानंतर सतत आठ दिवस नबाब तुमचाच तबला ऐकत राहिला. आज वाजवलेलं उद्या न वाजवता सतत आठ दिवस तुम्ही त्याला नवीन नवीन ऐकवलंत. आणि नबाबसाहेब अतिशय खूप झाले. एक हजार अश्रफींची थैली शाही खजिन्यातून तुम्हाला देण्यात आली–जी तुम्ही मोठ्या कृतज्ञतेने मुनीरखाँसाहेबांना अर्पण केली.

तबला अगदी शास्त्रोक्त पद्धतीने वाजवण्याकडे तुमचा कटाक्ष असे. कायद्यामध्ये मूळ बोलांव्यतिरिक्त बोलांची केलेली भेसळ तुम्हाला बिलकूल खपत नसे. त्याचप्रमाणे कुठला बोल तबल्याच्या कुठल्या भागावर वाजला असता कानाला गोड लागेल, कुठल्या अक्षरांच्या संयोगाने कुठले बोल निघतील व बोटे तयार कशी होतील या लहान दिसणाऱ्या पण अतिशय महत्त्वाच्या गोष्टींचा तुम्ही फार बारकाईने अभ्यास केलेला होता. एकदा कलकत्त्यातल्या काही तबल्याच्या विद्यार्थ्यांनी आनंद बोडसचा तबला ऐकला. आनंद तुमचा शागीर्द बनून ४/५ वर्षसुद्धा झाली असतील नसतील. ते तुम्हाला विचारावयास लागले की इतक्या अल्प कालावधीत तुमचा शिष्य एवढा तयार तबला कसा काय वाजवतो ? आम्ही तर गेली बारा वर्षं रियाझ करत आहोत पण तिरकिटसुद्धा द्रुत लयीत ह्याच्यासारखं वाजत नाही. त्यांना तुम्ही दिलेलं उत्तर फार विचार करण्यासारखं होतं... " बेटे, 'तीट' के साथ अगर 'तिरकिट' फसाया तो और बारह साल तुम्हारा 'तिरकिट' साफ नही निकलेगा."

संगीतात तबल्याचं स्थान खूप वरचं असूनसुद्धा तबल्याची संगत करणाऱ्याला योग्य मानधन दिलं जात नाही म्हणून आपण गेली काही वर्षं कुणाचीही साथसंगत केली नाही. फक्त स्वतंत्र तबलावादन केलंत. मुंबईच्या आकाशवाणीने मध्यंतरी स्वतंत्र तबलावादनाचे कार्यक्रम बंद करून टाकले. त्यामुळे बऱ्याच गरीब कलावंतांचं नुकसान झालं. त्यानंतर काही महिन्यांनी आकाशवाणीवर काही संगीतज्ञांची सभा बोलावली होती. श्री. बृहस्पती–भारतीय आकाशवाणी केंद्राचे चीफ प्रोड्युसर–त्यावेळी हजर होते. तुम्ही कळकळीने केलेल्या विनंतीचा, तुमच्या व्यक्तीमत्वाचा आणि एकंदर भाषणाचा योग्य तो परिणाम होऊन तबल्याचे कार्यक्रम आकाशवाणीवर पूर्ववत् चालू झाले.

तुम्हाला मी कधी रागावलेलं पाहिलं नाही. फक्त एकदाच तुम्ही खूप भडकला होतात. नांदणीकर वैद्य दरवर्षी मार्कंडेश्वर महोत्सव साजरा करीत असत. सर कावसजी जहांगीर हॉलमध्ये लागोपाठ दोन दिवस संगीताच्या मेहफिली झडत. आणि दरवर्षी न चुकता तुमचा तबला वाजत असे. एका वर्षी तुम्हाला बरं नव्हतं. पोटाचा वातविकार बळावला होता. रात्रीचे साडेअकरा वाजले तरी इतरच कार्यक्रम चालले होते. मी नियोजकांना सांगितलं की खांसाहेबांना बरं वाटत नाही तर त्यांचा कार्यक्रम लवकर आटपून घ्या. लागलीच तुमच्या तबल्याची घोषणा ध्वनिक्षेपकावर झाली आणि मी तुमचा तबला स्टेजवर नेऊन ठेवला. तुम्ही स्टेजवर जाणार इतक्यात पुन्हा एक घोषणा करण्यात आली की खांसाहेबांच्या तबल्याआधी एक नृत्याचा कार्यक्रम ठेवण्यात आलेला आहे. तुम्हाला खूप राग आला. मला म्हणालात मी आता एक मिनीटभर इकडे थांबणार नाही. आणि आपण टॅक्सीत जाऊन बसलो. इकडे नांदणीकरांना समजल्यावर ते तुम्हाला विनंती करण्यास आले. पण तुम्ही तुमच्या निश्चयापासून ढळला नाहीत. पी. मधुकरांनीसुद्धा तुमची आळवणी केली. पण काही उपयोग झाला नाही. आणखी कुणाची भीड पडू नये म्हणून तुम्ही मुलीची–अनूची शपथसुद्धा घेतली आणि आपण घरी गेलो.

अगदी अलिकडे तुमची प्रकृती फार खालावली आणि हट्टाने तुम्ही नायर हॉस्पिटलमधन घरी आलात त्यावेळची गोष्ट. जे. जे. हॉस्पिटलमध्ये येण्याबद्दल मी तुम्हाला खप आग्रह केला. पण तुम्ही नकार दिलात. अध्यात्मिक शक्ती लाभलेल्यांना त्यांचा मृत्यु ओळखता येतो म्हणतात. तुमच्या बाबतीत तसंच झालं असावं. तुम्ही मला कुरवाळत सांगू लागलात "बेटे, अब मेरी कोई ख्वाईश बाकी नही. बहोत नाम कमाया, पैसा कमाया – तुम्हारे जैसे शागीर्द मिल गये – ये पापा, तो मेरे लिये इतना करता है की, पूछो मत – रातभर बेचारा जगता रहता है – मैं बहोत तकदीरवाला हूं की मुझे ऐसा बेटा मिल गया है –" आणि तुम्ही बोलत राहिलात. बोलण्याचं त्राण नव्हतं तरीही. मी तुम्हाला गप्प केलं – म्हणालो "बाबा, अल्लाहको आपसे और भी बहोतकुछ करना है और हम सब शागीर्द आपको मक्कामदीना भेजना चाहते हैं" – – "बेटे ऐसा है कि अगर तकदीर में मक्का नही होती तो लखपती करोडपती भी वहाँ पहुँच नही सकता." मी एक पाहिलेलं आहे की, घरासमोर मशीद असून तुम्ही क्वचितच् सणामासी तिकडे जायचात. मात्र रोज रात्री एकटेच माळ ओढत बसलेले असताना तुम्ही जगालाही विसरायचात. शेजारची लहान लहान मुलं तुमच्याकडे गोळा झाली की तुम्ही माळ पेटीस ठेवायचात व त्यांना शाहजाद्यांच्या गोष्टी सांगण्यात गुंगून जायचात.

रमझानचे 'रोजे' चालू होते आणि एक दिवस पापा ऑफिसात आला. म्हणाला, आज शामको जरूर घर आना बाबाने बुलाया है. कधीतरी एकदा रमझानच्याच काळी 'रोजा' सोडताना केलेली 'चाट' मला आवडल्याचं मी सहज बोलून गेलो होतो. त्याची आठवण ठेवून तुम्ही मला 'चाट' खायला बोलावलं होतंत. स्वतः जातीने लक्ष घालून पापाकडून तुम्ही ती करवून घेतलीत. माझ्याप्रमाणे इतरही शागीर्द जमले होते. सर्वांना एकत्र बसवून चाट खायला घालण्याचा एक हट्ट तुम्ही पुरा करून घेतलात.

चार जानेवारीला शनिवार होता. मी सकाळीच तुमच्या प्रकृतीची विचारपूस करण्यास आलो होतो. तुम्ही जागेच होतात. पोटात खूप कळा येत असाव्यात. कण्हत होतात. जवळच पापा गाढ झोपला होता. अतिश्रमांनी त्याला ग्लानी आली होती. मी तुमच्या जवळ आलो. कपाळाला हात लावून पाहिलात. तुम्ही माझ्या गालावरून थरथरता हात फिरवला आणि निस्तेज पिवळ्या डोळ्यातून मुकं बोललात. मी गदगदलो. माझ्या डोळ्यातील टिपं तुमच्या अश्रूमध्ये मिसळून तुमच्या उशीत थिजली. हीच आपली अखेरची भेट.

दुर्दैवाने पाच तारखेला मला ऑफिसच्या कामासाठी बंगलोरला जावं लागलं. आमची कॉन्फरन्स चालू होती आणि ती क्रूर तार आली:

Our Khansaheb Expired on Fifth.

● ● ●

अनुक्रमणिका










# गीता-सार

—सौ. ज्योति सोमण

सौ. सुहासिनी मुळगांवकर हिने गायलेली गीतेची ध्वनि-मुद्रिका ऐकली आणि सहजच मनात विचार आला की ह्या ध्वनि मुद्रिकेतलं आपल्याला जे आवडलं, जे पटलं ते लिहावं. सौ. सुहासिनी-बद्दल, तिच्या एकपात्री नाट्यप्रयोगाबद्दल खूप जणांनी लिहिलं आहे; परंतु गीतेतील काही श्लोक स्वरबद्ध करणं हा तिच्या गायन-कलेचा एक नवाच पैलू आहे.

सुहासिनी ही संस्कृत घेऊन एम. ए. झालेली; एल्फिन्स्टन कॉलेजात दक्षिणा फेलो म्हणून मान्यता पावलेली विदुषी; त्यातच A. I. R. वर एक वर्षभर तिनं गीर्वाणभारती हा संस्कृत भाषेत प्रसारित होणारा कार्यक्रम यशस्वीपणानं हाताळलेला. संस्कृत गीतांच्या ध्वनिमुद्रणाबाबत तर ती आकाशवाणीवर अधिकारी व्यक्ती म्हणून समजली जाते.

गीतेवर रेकॉर्ड काढण्याची मूळ कल्पना श्री. रामेश्वरदासजी बिर्ला ह्यांची. त्यातून संस्कृत आणि संगीत ह्यांचा मनोहर मिलाफ सुहासिनीच घडवून आणील हा त्यांचा विश्वास. सुहासिनीचे वडील श्री. शंकरराव देशपांडे स्वतः शास्त्रीय संगीताप्रमाणेच अभंग व भजनेही उत्कटतेने गातात. सुहासिनीनेही श्री. रामेश्वरदासजी बिर्ला ह्यांच्या इच्छेला मान देऊन गीतेवरील ध्वनिमुद्रिकेची जबाब-दारी स्वीकारली.

गीता गायनाच्या दिग्दर्शनाची जबाबदारी श्री. यशवंत देव ह्यांनी मोठ्या कौशल्याने पार पाडली आहे. ते स्वतः एक उत्तम शब्द व स्वर रचनाकार व नामांकित गायक. तेव्हा त्यांनी व सुहा-सिनीने मूळ भर दिला स्पष्ट व शुद्ध शब्दोच्चारांवर. शास्त्रीय संगीतात स्वर प्रधान तर शब्द दुय्यम; पण सुगमसंगीत किंवा अभंग वा भजनात शब्द, अर्थ हे प्रधान व स्वर दुय्यम. हीच जाणीव संपूर्ण गीतागायनात दिग्दर्शक श्री. यशवंत देव व गायिका सुहासिनी ह्या दोघांनीही पाळली आहे.

श्री. चक्रवर्ती राजगोपालाचारी ह्यांनी संकलित केलेल्या श्री भगवद्गीता ह्या ग्रंथातून श्लोकांची निवड केलेली आहे. गीता-गायनातील श्लोकांचा परिचय श्री. डेव्हीड आब्राहाम यांनी हिंदी भाषेतून केल्याने अनायासेच भारतीय आचारविचारांना पोषक अशी वातावरणनिर्मिती साधली गेली आहे.

सर्वसामान्य माणसाला सहजी आकर्षन घेणारे व अंतःकरणाला सहज स्पर्श करणारे रागच ह्यात गायनासाठी योजलेले आहेत: यमनकल्याण, बागेश्री, पिलू, मिश्रमांड, चंद्रकंस, केदार ह्या रागांच्या योजनेमुळे गायनाचे स्वरही अनेकवेळा परिचयाचे वाटतात व त्यामुळे मन आणि कान आपोआपच शब्द आणि अर्थाकडे वेधले जातात. नाहीतरी अर्जुनाला गीताकथन करताना स्वतः भगवंतांनीसुद्धा गीतात म्हणजेच छन्दातच गीता सांगितली की नाही? अर्जुनाचे प्रश्नही गद्य नाहीत किंवा श्रीकृष्णांनी दिलेली उत्तरे, केलेला उपदेश किंवा सहजपणे उकलन दाखवलेलं जीवनाचं तत्त्वज्ञानही गद्यात नाही, पद्यात आहे.

पार्श्वसंगीतासाठी योजिलेल्या वाद्यमेळातही सतार, बांसरी, तंबोरे, घंटिका तरंग, स्वरमंडळ, संतुर ही खास भारतीय वाद्ये आहेत. त्यामुळेही गायनाला पोषक अशी पवित्र, गंभीर अशी वातावरण-निर्मिती साधली गेली आहे.

श्लोकांची निवड करताना वारंवार कानांवर पडणारे म्हणूनच परिचयाचे वाटणाऱ्या श्लोकांची निवड केली आहे. स्पष्ट शब्दोच्चारा-कडे व्यवधान ठेवताना ऱ्हस्व, दीर्घ शब्द, ओष्ठव्य, कंठव्य, तालव्य, हे वर्ण, क्ष, श, ष ह्या अक्षरातला अतिसूक्ष्म भेद, अनस्वार, जोडाक्षरे, पूर्वजांनी घालून दिलेले देववाणीचे निर्बंध, संस्कृत व्याकरणाच्या काटेकोर नियम मर्यादा ह्यांच्याकडे फार बारीक नजर ठेवली आहे.

वासांसि जीर्णानि यथा विहाय, कर्मण्येवाधिकारस्ते, उद्धरे-दात्मनात्मानं, ईश्वरः सर्वभूतानां, समोऽहं सर्वभूतेष, ये यथा मां प्रपद्यन्ते, हे श्लोक सर्वसामान्यांच्याही परिचयाचे आहेत व त्यामुळेच शब्द आणि अर्थ ह्याकडे मन आकर्षून घेणारे आहेत. यतो यतो निश्च-रति ह्यासारखे काही सुन्दर अर्थाचे श्लोकही अंतःकरणाची पकड घेणारे आहेत.

यत्करोषि, यदश्नासि ...... तत्कुरुष्व मदर्पणम ह्यातील शेवटच्या शब्दांच्या पुनरुक्तीने ती चाल कर्णमधुर झाली आहे. कर्मण्येवाधिकारस्ते, प्रयाणकाले मनसमाचलेन, ह्या चालीही छान वाटतात. प्रयाणकाले मनसा हा श्लोक मारवा रागात गाइल्याने जास्ती परिणामकारक वाटतो.

ध्वनिमुद्रिकेच्या शेवटी भैरवी योजून योग्य तो उत्कट बिंदू साधला गेला आहे.

पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते हा श्लोकार्ध दोन वेळा म्हटल्याने जास्तीच श्रवणीय वाटतो.

भगवत्गीतेतील काही निवडक श्लोक निवडून त्यात संस्कृत भाषेचं यथार्थ ज्ञान व संगीताची जाण यांचा श्रुतिमधुर संगम घड-विल्याबद्दल सुहासिनीचा हा प्रयत्न स्तुत्य आहे व अभिनंदनीयही आहे.

● ● ●



अनुक्रमणिका

(पृष्ठ १८ वरून–स्वर सृष्टीचा)

बसणारे स्त्री–पुरुष लहान मोठे श्रोते आण्णांच्या हार्मोनियमभोवती कोंडाले करीत ते भविष्य जाणून घेण्यासाठीही हात पुढे करीत. त्यांनी बांधलेली भविष्ये, उत्कर्षकालाची, सत्य सृष्टीत उतरलेले म्हणजे संगीत दिग्दर्शक नौशाद व रामचन्द्र चितळकर. श्री. जितेंद्र अभिषेकी यांच्या संबंधीही भविष्य त्यांनी अलिकडे वर्तवून ठेवले आहे म्हणे !

रंगात आले नि आण्णा पलंगावरून उठून कपाटाकडे वळले व शोभीवंत चांदीचा करंडा (अत्तरदाणी) हाती देऊन "४ जून १९४५ रोजी ही नजाकत मला कुणाकडून मिळाली म्हणून सांगू ? खाँ. अमानअल्लीखाँसाहेब यांचा गंडा कु. लताला बांधावा हा प्रफुल्ल पिक्चर्संचे मा. विनायक यांचा संकल्प. मी म्होरक्या बनलो. याची जाणीव ठेवून लगोलग लताने हा नजराणा मला माझ्या वाढदिवशी सादर केला." आण्णा इतक्या तल्लीनतेने सांगत रहातात की अत्तराच्या सुगंधासह स्मृतीचा सुगंधही दरवळत राहतो !

आणि, आण्णांच्या सर्व सांगण्यामध्ये तो गंगौघ शुद्ध सात्विक वाहात रहातो. कुणाचा मत्सर नाही, कुणासंबंधी हेवेदावे नाहीत, सर्वत्र समाधानच आहे. स्वराज्यातील चळवळीची अखेरी म्हणजे ४२ साल असे जर मानले, तर आघाडीवरील म्युझिक डायरेक्टर के. दत्ता या नावाचा जन्म बेचाळीस सालचाच. हे कोड नाव त्याना पै. मजहरखांनी दिले असे आण्णा नम्रतेने सांगतात. ते त्या काळचे मशहूर दिग्दर्शक-निर्माते. पं. विष्णु दिगंबरांनी प्रत्येक कॉंग्रेस अधिवेशनात 'वन्दे मातरम्' म्हणण्याचा पायंडा पाडला होता. गायक हा देशभक्त असू शकतो. कां नाही असणार ? १९३० मागूनच्या मिठाच्या सत्याग्रहात व प्रभातफेरीमध्ये गळयात पेटी बांधून मोर्चाच्या सुरुवातीस असत ते. श्री. कोरगावकर म्हणजे चालींचा खजिनाच. मराठी, हिंदी, उर्दू समूह गीते प्रभात फेरीत गर्जून असत.'सौम्य लाठी हल्ला, हा हल्लीचा मिळमिळीत प्रकार त्या चळवळीत नव्हता ! गोरे सार्जंट हे नुसते ठोकून काढीत. सोमण बिल्डिंगच्या आसपास 'कोरगावकर पार्टी' असता आण्णांच्या हातावर सार्जंट न्हीमरच्या लाठीचा फटका बसला पण बाजापेटी वाजतीच राहिली, गळयातील गाणी गर्जतच राहिली– ! या ठिकाणी आण्णांना महामना मालवीयांची आठवण येते. टिळक पुण्यतिथीस जनसमुदाय शांततेने व शिस्तीने एस्प्लनेड कोर्टासमोर खडा. रात्र संपते, पहाट उगवते आणि स्वयंसेवकासाठी चहा वाटतात कोण, तर, शुभ्र फेटयातील पं. मदन मोहन मालवीय! केळीच्या पानांचा तो द्रोण, त्या चहाची ती रुचि– सर्व सर्व आण्णा गहिवरून वर्णन करतात. चहा नव्हे ते गंगाजलच !

रसिकराज श्री. पु. ल. देशपांडे यांचे एक स्वप्न आहे. ते त्यांनी अनेक व्याख्यानात ऐकवले आहे, लेखात घोळवले आहे. मुंबई ही महान् भारताची सांगीतिक राजधानी. तीत एक विशाल संग्रहालय असावे. तबकडयांची लायब्ररी असावी. त्या तबकडया म्हणजे झाडून साऱ्या



त्या 'तारणहारा'च्या साक्षीने दत्तोपंताच्या एकसष्ठीला त्यांचे एक चाहते पुष्पहार अर्पण करीत आहेत

बोलपट संगीताच्या. संगीत म्हणजे,

"पंजाब, सिंध, गुजरात, मराठा, द्राविड, उत्कल, वंग
विंध्य हिमाचल जमुना-गंगा"–

बोलपट पडेल असला म्हणून काय झाले, त्याचाही समावेश झाला पाहिजे. बोलपटाचा बोजवारा वाजतो तो अनेक कारणांनी, म्हणून काय झाले ? पार्श्वसंगीत व पार्श्वगीते यासाठी अनेक कलावन्त रात्रंदिवस खपत असतात, त्यांच्या कृतींची लायब्ररी हवी. मुरलयींच्या पिपासूंनी यावे व तृप्त होऊन जावे. असे हे पुलकित स्वप्न साकार झाल्यास के. दत्ता यांचे 'स्थान' आगळेच रहाणार. रेडिओ कंपनी खाजगी असल्यापासून श्री. कोरगावकर तीत संगीत देत होते. पहिले चित्र संगीत श्री. मो. ग. रांगणेकरांच्या पद्यरचनेने युक्त असा 'चन्द्रराव मोरे' या बोलपटात कोरगांवकरांच्या संगीत चाली. हायब्रीड पिकाचे विक्रम आपण आजकाल वाचतो. चालींच्या चलतीच्या काळात १९३६ ते ३७ या एकाच वर्षात कोरगावकरांच्या फडातून १००० कणसे बाहेर आली ! आणि ती सर्व वेगवेगळया थाटाची. ती सर्व गाणी कुठे गेली ? दिवसात एक दोन गाण्यांना चाली लावल्याशिवाय त्यांच्या डोळयाला डोळा लागत नसे, म्हणे ! किती तरी ग्रामोफोन आर्टिस्ट के. दत्तांच्या साम्प्रदायाशी भक्ती बाळगून होते. रेडिओचे आकाशवाणीकरण होण्यापूर्वीपासून के. दत्ता श्रीकृष्णाष्टमी, सीमोल्लंघन, होलिकोत्सव, रामजन्म कल्पना रम्यतेने सादर करीत असत. 'रूठो ना तुम बहार में' या सलामीच्या युगल गानाचे स्वरलेखन के. दत्तांचे होते. गाय-गायिका होते महंमद रफी, सुरय्या. उस्ताद बडे गुलाम अल्ली उदयाचलावर असता 'जानेवाले जरा दुनियाका चलन देखता जा' या सुरैय्याने गायिलेल्या गीतावर फिदा झाले होते ते. पं.



## सामगायन (२)

बाला आहे ती, पण अप्रगल्भ झाली मने आमची. स्त्री आहे ती, पण कातर झालो ते आम्ही. उन्नत स्तनांचा भार धारण करिते ती, पण श्रम होतात ते आम्हाला. विशाल आहे मदनमंदिर ते तिचे, पण पाय गळाले ते आमचे ! काय आश्चर्य पहा. दोष दुसऱ्याचे ठिकाणी आणि व्यंगे मात्र आमच्या नशिबी !

सा बाला वयमप्रगल्भमनसः, सा स्त्री वयं कातराः
सा पीनोन्नतिमत्पयोधरयुगं धत्ते सखेदा वयम्।
साक्रान्ता जघनस्थलेन गुरुणा गन्तुं न शक्ता वयं
दोषैरन्यजनाश्रयैरपटवो जाताः स्म इत्यद्भुतम् ॥

–'सहृदय'

अनंतकुमार यांच्या ओळखीने 'रंगमेहेल' या चित्रपटात श्री साऊंड स्टुडिओमध्ये वडेजी उपस्थित होते. आणि पंजाबी ढंगाच्या चाली ऐकून ते गुंग झाले. संगीत दिग्दर्शक के. दत्ता यांना तो २१ जुलै १९४५ हा दिवस सोनियाचा वाटावा यात काय नवल ? १९३६-मध्ये कुमार गंधर्वांच्या कुमारावस्थेत प्रो. वी. आर. देवधर यांच्या मनात मराठी भावगीत मुद्रित करण्याचा विचार आला. तो साकार केला कोरगावकरांनी. 'ये मोहना कान्हा (राग-तिलंग) व 'प्रेमा द्यावा ठावा (राग-नन्द) ही ध्वनिमुद्रिका बालपणी घेतली गेली होती हे पं. कुमार गंधर्वांच्या ध्यानात असेल की नाही कोण जाणे ! कारण, ग्रामोफोन कंपनीने कितीक मुद्रिका नष्ट केल्या आहेत, त्या दुर्मिळ झाल्या आहेत. नष्टचर्य इथवर येऊन ठेपले की, बालगंधर्वांच्या उत्कर्ष कालातील ध्वनिमुद्रिका पुनर्मुद्रित करण्यासाठी हिज मास्टर्स व्हॉईस कंपनीला हर हायनेस देवी श्रीमती इन्दुमती राणीसाहेबांकडे कोल्हापुरास धाव घ्यावी लागली ! स्व. दीनानाथांच्याही ध्वनिमुद्रिका अशाच दोघा संगीत `मी गृहस्थांकडून लाभल्या व तो समारंभ रवीन्द्र नाट्यगृहात दि. २४ एप्रिलला साजरा झाला. श्री. आण्णा कोरगावकरांना आता निश्चित सांगता येत नाही, की आपण किती शब्द समूहांना किती चाली दिल्या ते ! अनेकांनी त्यांच्या चालींचे हरण केले पण नामोहरम न होता वा नाराज न होता त्यांनी आपले कार्य चालू ठेवले. मधुकर पिक्चर्सच्या दामनमध्ये ठरलेला दाम कु. लताला मिळू शकला नाही, मग तो संगीत दिग्दर्शक के. दत्तापावेतो कसा पोहोचणार ? लक्ष्मी म्हणजे चंचलतेबद्दल विख्यात. त्या काळात लता मंगेशकरांनाही ती दुरावली मग कोरगावकरांनी तरी का खंत बाळगावी ? १९२८ साली म्हणजे 'मिशी व विशी' या शिवेवर असता श्री. आण्णांना एका इटालियन पियानो वादकाने निहायत खूप होऊन उभ्या बैठकीत हाती ५०० रुपयांच्या नोटा कोंबल्या हे त्याना काल घडल्यागत आठवते. करुण रस कसा कसा निर्माण होऊ शकतो त्या स्वरपंक्ती कोरगावकरांनी वाजवून दाखवल्या.

ज्यांनी ब्रिटिश सार्जंटांच्या लाठ्या खाल्ल्या त्यांना दहा वर्षांनी वॉर फंडासाठी संगीत सभा साजरी करण्याची विनंती करण्यात आली ! या वेळचे गव्हर्नर सर रॉजर लमले यांनी सुबद्ध कार्यक्रम योजनेबद्दल श्री. कोरगावकरांची पाठ थोपटली हा एक प्रसंगही आण्णांना वृद्धावस्थेत स्मृतिधनाचा ठेवा वाटतो, तसेच १९४० मे-मध्ये ब्रेबोर्न स्टेडियमवर सलामीचे वृंदवादन घडून आले ते.

गेली अनेक वर्षे मात्र आण्णांनी भगवान श्री साई बाबांच्यावर हवाला ठेवलेला आहे. सत्पुरुष श्री साटम महाराज यांच्या दोन प्रतिमा त्यांच्या दोन खोल्यांमध्ये शोभून दिसतात. संगीतात एकच षड्ज (सा) मात्र या संगीतज्ञाच्या हृदयाच्या वीणेच्या तारा साईबाबा व साटम महाराज यांच्या आद्याक्षरांनी पिळलेल्या दिसतात. तो देव्हारा, त्या पादुका त्यांच्या वास्तूस भेट देणाऱ्यांना दिलासा देतात–

साई चरणी लागता ध्यान गळाला पूर्ण देहाभिमान
वृत्ति पावली समाधान पूर्ण कृष्णार्पण देहास ॥

साई माऊलीसारखीच आपली जन्मदात्री आई व तिची आई या दोघींविषयी आण्णांना नितांत आदर. मुंबईत स्थलांतर घडले व पहिल्या स्त्री नाट्य-लेखिका सौ. हिराबाई पेडणेकर यांचे शेजार लाभले. खाँ. नझीर खाँ (भेंडीबाजारवाले) हे त्यांचे गुरु. यामुळेच आण्णांना लहानपणीच काही वेगळ्या चिजा ऐकायला मिळाल्या. श्रीमती इंदिराबाई वाडकर (या पण सावंतवाडीच्या) व त्यांना तालीम द्यायला आग्रेवाले उस्ताद विलायत हुसेन खाँ येत असत. त्या नोमतोमवरून मिशी फुटायच्या आधी दत्ताला कंठ फुटला. मुंबईतल्या मार्गावरील पाट्याच पाट्या पाहून या 'अशा मुक्या का' असे त्याला वाटे ! उभ्या उभ्याच तो त्या शब्दांना नादबद्ध करी. "या शब्दांना चाली लावणे हाचि मनी संकल्प" हे काव्य दत्ताचे, पण पहिली ओळ ही पाटीत ठळकपणे छापलेली दिसे "दद्रुविनाशक गोळ्या आणि भल्लातक कल्प" अशा प्रकारे डोक्यात सदा गायनाचे सूर ! रागदारीतही चिजा रचायचा छंद आणि कागद पेन्सिल हाती नसता दत्ताने एका कर्नाटक संगीत पंडितासमोर (म्हैसूर दरबार गायक बिडार कृष्णाप्पा) सोहनी रागातील एक हिंदुस्तानी चीज गाऊन दाखविली. पंडितरावांच्या मते ती मूळची 'खमाज'मधील व या विशीतील तरुणाचे हे कसब पाहून त्यांनी त्याची पाठ थोपटली. 'ठोकून देतो ऐसाजे' अशा हातचलाखीचे फळ म्हणजे ब्रॉडकास्टिंग कंपनीत प्रवेश मिळवणे, व सोहनीमुळे सोने झाले.

रागदारीत चिजा बांधण्याच्या छंदामुळे करवीर नगरीत उमेदवारी करणाऱ्या सिनेटोनमधील, मोगलाईतून संस्थान राजवटीत नशीब काढायला आलेल्या, श्री. जगन्नाथ पुरोहित यांची श्री. कोरगावकरांशी गाठ पडली. पुढे दीड तपानी मुंबईत ते पं. जगन्नाथबुवा म्हणून मान्यवर झाले. के. दत्ता यांच्या रचनेत रागदारीचा गाभा आहे. रणजितमध्ये खाँ. झेंडे खाँ यांच्या सहवासाचा लाभही त्यांनी उठविला, तसेच पं. दिलीपचंद वेदी, पं. गंगाप्रसाद पाठक, पं. रेवाशंकर यांचेही ऋण आण्णा मान्य करतात. राजस्थानी, मारवाडी, पंजाबी, भोजपुरी व बंगाली सर्व ढंग त्यांनी कौशल्याने हाताळले. मलुहा केदार, अल्हैया बिलावल, ब्रिन्दावनी सारंग भटियार, नट बिहाग व नन्द अशा रागातील गोडवा ओळखणारे व सहजतेने











योजना करणारे आण्णा हे पहिले संगीत दिग्दर्शक असावेत. पं. जगन्नाथबुवांनी म्हणे आपल्या या एकेकाळच्या सिने मित्राला सांगितले की झपतालात वसन्त रागात वंदीश तयार करा. कोरगावकरांनी दुसऱ्या दिवशी ती चीज तयार करून ऐकवली, बुवांना हे मोठे समाधान असे.

पण मराठी जनतेने ऋण मान्य करावे असे या कालोदरात गडप होऊ पाहणाऱ्या 'आवडत्या आण्णांनी' रसिकांना खूप खूप दिले आहे. सांप्रत 'विविध-भारती' त्याच त्याच चालीच्या स्वरबद्ध जाहिराती कानीकपाळी ऐकविते व ३६ वर्षापूर्वीच्या या कल्पक निर्मिती वीराची आठवण देते. पण यांची आठवण आकाशवाणी भवनाच्या भितींना तरी आहे काय ? खरंच, मनाला रुखरुख लागते की या गीत कलाकाराने मागे मागे रहावे असे काय घडले ? 'स्वर-सम्राज्ञी लता गौरव ग्रन्था'त अखेरचा लेख अष्टपैलू व्यक्ती अशा श्री. पु. ल. देशपांडे यांचा आहे. अंबारीचा गजराजच तो! मिरवणुकीतील त्याचे ते स्थान योग्यच. संगीत दिग्दर्शकांच्या शतनामावलीत सुरवातीची नावे गुलाम हैदर, खेमचन्द प्रकाश यांची व शंभरावे डी. पी. कोरगावकर यांचे. हेही मानाचे पान समजावे नाहीतर काय ?

● ● ●

(पान १६ वरून—जुग जुग... )

पाहता पाहता पंडीतजी स्वतःला हरवून बसले. साऱ्या जगाला विसरले. त्यांच्या दृष्टीनं उरले ते फक्त त्या मुलतानीचे सूर. त्यांनी निर्माण केलेलं तरल भावविश्व. त्यातल्या कुठल्यातरी कोपऱ्यात ते उभे होते. त्या प्रचंड स्वप्नमय वास्तूत त्यांची देहाकृती कुठंतरी अडगळीसारखी पडली होती. गेल्या चाळीस वर्षांची साधना, कीर्ती, घराणे निर्माण करायची जिद्द, शिष्य परिवार, त्यांचं अभूतपूर्व म्हणून मानलेलं गाणं, सारं सारं काही कुठेतरी कस्पटासारखं वाहून गेलं.

उरला तो एक साधा माणूस. रामप्रसाद. तीस वर्षापूर्वीचा. तिचं बोट धरून गाण्याच्या प्रवासाला निघालेला. तिच्या मायेच्या वर्षावानं क्षणोक्षणी चिंब होऊन मोठेपणाची स्वप्ने पाहणारा.

मुलतानी कधी संपली आणि ती मुलगी आली तशी अकस्मात् त्यांना प्रणाम करून कधी निघून गेली हेही त्यांना कळलं नाही.

ते भानावर आले तेव्हा सारे लोक भोवती जमलेले होते. थिएटरभर टाळ्यांचा न भूतो न भविष्यति असा कडकडाट सुरू होता.

कुणी तरी म्हटलं,

'पंडीतजी अब आपके गानेका आयटेम है. सारे लोक आपलं गाणं ऐकायला उत्सुक झाले आहेत.

पंडीतजी काही बोललेच नाही. मग एकाएकी त्यांच्या डोळ्यातून धारा वाहू लागल्या.

मोठ्या कष्टानं उठत ते म्हणाले,

'आजतक पंडीत रामरंजनने आपको बहोत दिया. बस्स! अब उसे बची हुवी जिंदगीमे रामप्रसादही रहने दो.'

आणि मग त्या साऱ्या उत्सवाचा केंद्रबिंदू असलेला तो महातपस्वी विस्मयाने थक्क झालेल्या भोवतीच्या नजरांमधून वाट काढीत थिएटरच्या बाहेर पडला आणि फुटपाथच्या गर्दीत मिसळून गेला!

● ● ●





अनुक्रमणिका



रजत महोत्सवी
वर्षानिमित्त
खास लेख
२

# 'दीपावली'ने सजविलेले 'विशेषांकां'चे विशेष दालन

— प्र. श्री. नेरुरकर

महाराष्ट्रात वर्षानुवर्षे निघणाऱ्या खास 'दिवाळी' अंकांमध्ये 'दीपावली'चे स्थान काही वेगळेच व तिचे वैशिष्ट्यही आगळेच आहे. 'दीपावली' भरघोस स्वरूपात असंख्य मराठी रसिकांसमोर आली तीच मुळी खास 'दीपावली' अंकाचा अवतार घेऊनच. १९४५ साली 'दीपावली'चा पहिलावहिला खास 'दिवाळी' अंक प्रसिद्ध झाला. त्याचे स्वरूप लक्षात घेण्यासारखे आहे. आजही तो अंक किती ताजातवाना व टवटवीत वाटतो ! (रंगीत मुखपृष्ठ दीनानाथ दलालांचे. विषय : स्त्री ! हिंदू सात्विकतेची व मांगल्याची प्रतिमा ! ती समईवर निरांजन पेटवून घेत आहे ! ) अंकाची किंमत दोन रुपये. पृष्ठे २२५ च्या वर. संपादक म्हणून दोन नावे आहेत. एक रॉय किणीकर व दुसरे चित्रकार दलाल. विनीचे लेखकवर्य आहेत ते असे : आचार्य काका कालेलकर आचार्य अत्रे, कुसुमाग्रज, ना. सी. फडके, अनंत काणेकर, बा. सी. मर्ढेकर, कै. वा. म. जोशी, मो. ग. रांगणेकर, स. आ. जोगळेकर, वि. वि. बोकील, बाबुराव गोखले, श्री. म. माटे, शामराव ओक, वि. स. खांडेकर, वा. भ. बोरकर, श्री. के. क्षीरसागर, दत्तो वामन पोतदार, पु. रा. लेले, वसंत लाडोबा म्हापणकर, य. गो. जोशी, र. गो. सरदेसाई, चिं. वि. जोशी, कवि यशवंत, ना. ह. आपटे, रघुवीर सामंत, राजा बढे, पु. भा. भावे, ग. ल. ठोकळ, प्रभाकर पाध्ये, दत्तु बांदेकर, पु. य. देशपांडे आणि इतर. आतील वाङमयाची सुरुवातच कविवर्य कुसुमाग्रजांच्या 'आदि स्त्री' या मुक्तछंदी दीर्घ प्रभावी कवितेने होते. या पहिल्याच अंकाला 'शेवटचे पान' आहे व ते महत्त्वाचे आहे; कारण त्यावर आपल्याला 'दीपावली'-च्या जन्माची कथा वाचायला मिळते : ते 'शेवटचे पान'च मी प्रथम उद्धृत करीत आहे . . . . .

"तसे पाहता हे पहिले पान; पण फक्त पानभर मजकूर आणि तोही कसाबसा शेवटच्या फार्मवर जाऊ शकेल असे आमच्या फोरमनने आम्हाला प्रेमळपणे वजावल्यामुळे हा मजकूर शेवटच्या पानावर जात आहे.

'दीपावली'ची अस्फुट कल्पना दीड दोन महिन्यापूर्वी एका सु-संध्याकाळी आम्हाला सुचली, पण ती अस्फुट कल्पना दीडदोन महिन्याच्या अवधीत इतक्या भरीव आणि आकर्षक स्वरूपात अवतीर्ण होईल अशी खरोखर कल्पना नव्हती !

पण कित्येकदा जन्मजात आळशी आणि बेजबाबदार माणूस प्रसंग येताच एखादा विलक्षण चमत्कार करून दाखवितो असे ऑस्कर वाइल्डने कुठेसे म्हटले आहे ! तेच खरे.

'दीपावली' काढायचे नक्की ठरले, छपाईच्या मुहूर्ताचा नारळ फुटला, आणि आम्ही छापखान्याच्या आखाड्यात उतरलो—पण पहिल्याच एका बड्या लेखकाच्या सलामीची माती कपाळाला लागली न लागली तोच आमचे पाय लटपटू लागले—कारण,

मजकूर कुठे आहे ? 'दीपावली'च्या जाहिरनाम्यात उद्घोषित झालेला मजकूर कुठे आहे ?' सिलेंडर मशीनची ही तालबद्ध ओरड, धडका आणि धडधडाट ऐकताच आमच्या छातीत धस्स होई—आणि वाटे, कशाला या नसत्या उपद्व्यापात पडलो ! —आमचे थोर लेखक ऐनवेळी 'माफ करा बवा, पुढल्या वर्षी मात्र अवश्य काही तरी लिहीन' असा दीपावलीसाठी शुभसंदेश पाठवून आमची मान तर उतरविणार नाहीत ना अशी शंका, भीती आणि धास्ती शेवटच्या पानापर्यंत आम्हाला वाटत होती ! परंतु तसे झाले नाही. उलट रसाळ वाङमयाच्या बाबतीत अमृताशीही पैजा

**....मराठी सारस्वताच्या दरबारातील 'दीपावली'चे विशेषांक म्हणजे शारदेच्या गळ्यातील एक तेजस्वी आभूषण तर आहेच, तसेच चोखंदळ वाचकांना रिझविणारे शब्दरंगरूप लेणेही आहे....**

मारणाऱ्या आजच्या नामवंत लेखक श्रेष्ठींनी दिलेले अभिवचन पाळले आणि आम्हाला पुढच्या दीपावलीपर्यंत ऋणी करून ठेवले आहे!..." पहिल्या 'दीपावली'च्या शेवटच्या पानावरचा हा आरंभीचा अर्धभाग!

मुलाचे पाय पाळण्यात दिसावेत त्याप्रमाणे 'दीपावली'च्या पुढील पंचवीस वर्षांच्या वाटचालीतील सर्व दिवाळी व इतर खास अंकांचे 'पाय' या पहिल्या 'दिवाळी' अंकात ठळकपणे दिसतात. हे पाय नुसते कोरडे नाहीत. ह्यानी ललित वाङ्मयाचे व कलेचे नाजूक, मनोहर, नाद व रंगमधूर असे घुंगुरवाळे या पायात सुरुवातीपासूनच आहेत. या अंकात चित्रकार दीनानाथ दलाल यांची तीन रंगीत चित्रे आहेत. ती या अंकातील कवितांइतकीच भावरम्य व भावकरुण आहेत. शिवाय प्रसिद्ध छायाचित्रकारांची छायाचित्रेही आहेत. १९४५ साल! दुसऱ्या भीषण महायुद्धाचा रणकल्लोळ संपुष्टात येण्याची सुचिन्हे दिसत होती त्याच क्षणाला भारतीय स्वातंत्र्याचा लढा परमोच्च बिंदूला जाऊन पोचलेला होता. आमची पिढी नुक्ती कुठे विशी ओलांडून 'मिशी'त येत होती किंवा आलेली होती. १९४५ सालचा सगळा 'मूड' आजही १९४५ सालच्या 'दीपावली'च्या या पहिल्या खास अंकात जिवंतपणे प्रत्ययाला येतो..मन कसे भरकन् मागे मागे जाते! आणि 'दीपावली'च्या या अंकावर -स्थिरावते!..अंकातील दलालांचं पहिलंच 'रक्त आणि अश्रू' हे रंगीत चित्र पहा! आजही हे 'रक्त आणि अश्रू.' अजून थांबलेले नाहीत! आशिया खंडातच ही रणदेवता अक्राळविक्राळ व भुकेलेली होऊन या चित्रातील कुंपणांच्या तारांवर कोसळलेल्या विद्ध तरुणासारख्या असंख्य तरुणांचे रक्त जिभल्या ओल्या ठेवून चाटतेच आहे! इतके बोलके चित्र! एक अक्षर–कलाकृती! 'दीपावली'चे हे वैशिष्ट्य पंचवीस वर्षेपर्यंतही कायम राहिले आहे! तर आचार्य अत्रे या अंकात एक पानी छोटेखानी लेख लिहून तरुणांना सांगतात 'तरुणांनो, अविचारी व्हा! (पंचवीस वर्षानंतर आजचा तरुण खरोखरच किती म्हणून अविचारी झालेला दिसतो आहे!). अत्रे लिहितात,... "तरुणानो, विचार करू नका, कुविचार करू नका, अत्याचार करू नका, अविचार करा! डोकी भडकून द्या. रक्त उसळू द्या. मनगटे शिवशिवू द्या. छातीमधल्या आगीच्या ज्वाळा धगधगू द्यात! म्हणजेच तुमच्या कृतीमधून जीवन आणि नवीन युग निर्माण होईल. डोकी खाजवीत बसल्याने देश स्वतंत्र होणार नाही हे नीट लक्षात ठेवा!"

'दीपावली'च्या या पहिल्या अंकाची आणखी काही वैशिष्टचे इथे ठळकपणे टिपावीशी वाटतात: एक म्हणजे 'दीपावली'ची कथा. हाच काळ नवकथेच्या उदयाचा व विकासाचा काळ होय आणि नवकथाकारांपैकी ज्येष्ठ कथा लेखक पु. भा. भावे यांची 'सीमेवर' ही प्रसिद्ध कथा याच अंकात प्रसिद्ध झाली आहे. तेव्हापासून मात्र भाव्यांची हजेरी 'दीपावली'च्या कोणत्याही दिवाळी अंकात चुकलेली नाही. अरविंद गोखले, माडगूळकर ही मंडळी 'दीपावली'कडे जरा उशीराच आलेली दिसते. पण भाव्यांबरोबरच त्याकाळचे ज्येष्ठ कथाकार व निबंधकार 'दीपावली'च्या या अंकात आढळतात. पहिलीच कथा ना. सी. फडक्यांची आहे. चिं. वि. जोशी, श्री. म. माटे, वि. वि. बोकील, ना. ह. आपटे, रघुवीर सामंत, य. गो. जोशी व प्रभाकर पाध्ये यांच्याही कथा या अंकात समाविष्ट आहेत. वि. स. खांडेकर व अनंत काणेकर यांनी लघुनिबंध लिहिले आहेत. कथेबरोबरच विचारप्रवर्तक लेख हेही या अंकाचे दुसरे वैशिष्टच नजरेत भरते. स. आ. जोगळेकरांनी 'गाथासप्तशती'चा परिचय करून दिला आहे. मो. ग. रांगणेकरांचा 'धंदा आणि जीवन' हा उपरोधात्मक लेख आहे. 'बोलण्याच्या व ऐकण्याच्या कले'वर श्री. के. क्षीरसागरांनी लिहिले आहे. दत्तो वामन पोतदारांनी काळकर्ते शिवरामपंत परांजप्यांवर लिहिले आहे. पु. रा. लेले यांनी कै. काकासाहेब खाडिलकरांच्या नाटकांचा आढावा घेतला आहे. 'भविष्या'वर म्हापणकरांनी भाष्य केले आहे. र. गो. सरदेसाईनी 'बसलेल्या, चाललेल्या व पडलेल्या' 'नाटकां'वर लेखणी धरली आहे; त्र्यं. वि. पर्वते 'मुलाखती'च्या कलेबद्दल खूप काही सांगून जातात. रा. प्र. कानिटकरांनी १९४५–४६ सालच्या वाङ्मयाचे समीक्षण केले आहे. एवढेच नव्हे तर प्रा. ज. नी. कर्व्यांचा 'सर्पमणि' हा विज्ञानविषयक शास्त्रीय लेखही या अंकात समाविष्ट आहे. द. वा. केळकरांनी 'महायुद्धाच्या सहा भेसूर वर्षां'चा परामर्श आर्थिक विषयाच्या शास्त्रीय पातळीवरून घेतला आहे. चित्रपटकला व कलावंतांवरही एक लेख आहे, तसाच 'चले जाव' ते 'चलो दिल्ली'पर्यंतची राजकीय टिपणेही आहेत. कविताही आहेतच व गंमत म्हणजे बोरकर, बढे, कवि यशवंत यांच्याबरोबर कवि म्हणून कै. बा. सी. मर्ढेकर व मनमोहन यांची उपस्थितीही डोळ्यात भरणारी आहे. मर्ढेकरांच्या 'संगम' या कवितेत पुढे मराठीत स्थिर










अनुक्रमणिका

झालेल्या 'मर्ढेकरी काव्य संप्रदाया'ची यत्किंचितही कोणतीच चुणूक किंवा चाहूल धुंडाळूनही मिळत नाही.

१९४६ साली निघालेल्या 'दीपावली'च्या दुसऱ्या खास दिवाळी अंकाचे स्वरूपही वरील प्रमाणेच आहे; परंतु तरीही त्यात नवता व वेगळेपणा आहे. या अंकात पहिल्या अंकातील दीनानाथ दलालांच्या 'रक्त आणि अश्रू' या रंगीत चित्राची आठवण करून देणारे 'गोमंतकाचे अग्निदिव्य' हे विलक्षण बोलके व अंतःकरणाचा ठाव घेणारे चित्र आहे. डॉ. राम मनोहर लोहियांनी पोर्तुगीजांना प्रत्यक्ष गोव्यात प्रवेश करून आव्हान दिले होते. आणि पुनः एकदा 'गोवा मुक्तिसंग्राम' प्रज्वलित होण्याची चिन्हे दिसू लागली होती. असा तो काळ! या अंकात आचार्य धर्माधिकारी, आचार्य विनोबा भावे, आचार्य काका कालेलकर, यांच्या लेखांबरोबरच साने गुरुजींची 'वात्सल्य' ही कथा आहे. वि. स. खांडेकरांची कथा आहे व कवींमध्ये श्रीकृष्ण पोवळे व पु. शि. रेगे हे कवी नजरेत भरणारे आहेत. पु. भा. भाव्यांची त्या वर्षी व नंतरही बराच काळ गाजलेली 'सतरावे वर्ष' ही अक्षर-कथाकृती याच अंकात आहे. क्रांतीच्या पार्श्वभूमीवरची ग. दि. माडगूळकरांची 'कृष्णाकाठी' ही कथाकवितापण आहे. केशवराव भोळे, पां. वा. गाडगीळ, वसंत शांताराम देसाई, व भालाकार भोपटकर यांनी वैचारिक लेख लिहिले आहेत तर कै. माधवराव जोशी यांचा 'जो गल्लादास तो कालिदास' हा आत्मकथनपर खुमासदार लेख आहे. 'दीपावली'च्या या पहिल्या दोन खास अंकांवरूनच दीपावलीच्या वाङ्मयीन दर्जाची व संपादन कौशल्याची कल्पना वाचकांना यावी.

### श्री. पु भा. भावे यांचे खास दालन

संस्कृतमधील 'प्रतिभे'च्या व्याख्येत थोडा बदल करून मी म्हणेन 'नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञा—दीपावली..' या पुढील 'दीपावली'च्या सर्वच खास अंकातून प्रतिभेचा व प्रज्ञेचा जुन्यानव्या व अतिनव्या साहित्यिक पिढ्यांचा हवाहवासा वाटणारा नवानवा उन्मेष, नवानवा जोमदार, ऐटदार, जातिवंत व अभिजात असा नेत्र-दीपक आविष्कार पानापानावर भरभरून आढळून येतो. १९४९ सालचा 'दीपावली'चा खास अंकच पहा. आता स्वातंत्र्य-सूर्य उगवून दोन वर्षे झाली आहेत. पहिल्याच पाव पानावर दलालांचे व्यंगचित्र.. 'स्वातंत्र्य-सूर्य केव्हाच उगवला! उठा, जागे व्हा आणि अधिक धान्य पिकवा!

हे त्यावरील शीर्षक आणि त्याच्या शेजारीच पु. भा. भाव्यांचे पुण्याहून (२५–९–४९) लिहिलेले पत्र. भावे लिहितात, "श्री. रॉय किणीकर व चित्रकार दलाल ह्यांस सप्रेम नमस्कार, वि. वि.... गतवर्षीच्या 'दीपावली'त आपण वाचकांना कोणती गोष्ट, कविता, चित्र-कल्पना आवडली व कां ह्याविषयी पत्रे मागवली होती. 'यंत्र' ही गोष्ट आपणास आलेल्या साडेसातशे पत्रांपैकी पाचशेहून अधिक वाचकांना आवडल्याचे वाचून, कोणत्याही डोके ठिकाणावर असलेल्या लेखकास वाटावा तेवढा आनंद वाटला. 'यंत्र' या कथेत प्रेम नव्हते, 'तंत्र' वगैरेही नव्हते. तरीही वाचकांनी तिच्या वतीने निर्णय दिला. ह्याचा अर्थ इतकाच की साकल्याने पहाता आमचा वाचक वाटतो तेवढा अरसिक अथवा मूर्ख नाही. 'मॅडम पिशी' ह्या माझ्या त्याच अंकात प्रसिद्ध झालेल्या सुदीर्घ प्रेमकथेचेही मुक्त मनाने स्वागत झालेले पाहून तोच वाचक किती सूक्ष्म व चतुर आहे याचीही खात्री झाली पांच वर्षापूर्वी 'दीपावली' वार्षिक काढण्याची कल्पना मराठीत तरी अभिनव होती. आपण आपले साहित्य अत्यंत रसिकतेने, कसोशीने व कौशल्याने संपादित करीत असता. आता आपले दिवाळी वाङ्मयातील स्थान अतिशय मानाचे व अगदी वरचे आहे ह्याविषयी 'दीपावली'वर पडणाऱ्या उड्या पाहता, मराठी वाचकांनी शंकेला जागा ठेवलेली नाही. परंतु 'दीपावली'च्या उपक्रमाच्या सुरुवातीच्या वर्षात मी आपणास थट्टेने असे म्हटल्याचे आठवते की, "आपण आपला हा वार्षिक खटाटोप वर्ष दोन वर्षातच आटोपणार काय?...' माझी बत्तीशी आपणास चांगल्या शकुनाची लाभल्याचे मी पाहत आहे. आता उलट सांगणे इतकेच की 'यावच्चंद्रदिवाकरौ..' म्हणजेच निदान तुम्ही आम्ही आहोत तोपर्यंत तरी 'दीपावली' प्रकाशनाचा वार्षिक सोहळा असाच चालू ठेवावा."

१९४८ सालच्या 'दीपावली'त प्रसिद्ध झालेली भाव्यांची 'मॅडम पिशी' ही खरे म्हणजे कादंबरिकाच होती व १९६९–७० सालच्या रौप्यमहोत्सवी वर्षातही 'दीपावली'ने कादंबरिका लेखनाची स्पर्धा जाहीर केली आहे हा योगायोग वैशिष्ट्यपूर्ण आहे. तसेच १९५० च्या 'दीपावली'त पहिलीच लघुकादंबरी प्रसिद्ध झाली आहे. पु. भा. भाव्यांची 'अकुलिना' ही गाजलेली ती पत्रात्मक कादंबरी होय. त्यानंतर १९६८ सालच्या 'दीपावली'च्या खास दिवाळी अंकासाठी लघुकादंबरी-लेखनाची स्पर्धा जाहीर करण्यात आली. आणि प्रभाकर पेंढारकर व रवीन्द्र पिंगे हे दोन उगवते कादंबरिकार या स्पर्धेत यशस्वी ठरले, व 'दीपावली'तून वाचकांपुढे आले आहेत. हाही लक्षणीय योगायोग! १९४९ सालच्या अंकात कथाकार म्हणून अरविंद गोखले व गंगाधर गाडगीळ यांची उपस्थिती प्रथमच लागलेली आहे व गोखल्यांच्या बाबतीत म्हणावयाचं तर ती पुढील वीस वर्षे 'दीपावली'त सतत टिकून राहिली आहे.

'दीपावली'च्या पंचवीस वर्षांच्या 'साहित्य-कला-संगम' साधणाऱ्या कारकिर्दीत दिवाळी खास अंकांचे स्वरूप वेगवेगळ्या तीन टप्प्यांवर वेगवेगळी संपादकीय व रचनात्मक वळणे घेत गेलेले दिसते. १९४५ ते १९५२ पर्यंतचा एक टप्पा; १९५२ ते १९६२ पर्यंतचा दुसरा टप्पा; आणि १९६८ पर्यंतचा तिसरा टप्पा: १९५६ सालापासून श्री. ग. रा. कामतांचे संपादकीय सहकार्य श्री. दलालांना मिळाले; रॉय किणीकरांची कारकीर्द संपलेली होती; त्यानंतर काही काळ विजय तेंडुलकरांनी 'दीपावली'च्या संपादन-कार्यात हातभार लावला. नंतर कै. गोपाळकृष्ण भोबे 'दीपावली'च्या संपादन-सहकार्यात 'दीपावली' परिवाराचे एक कुटुंबीयच बनून गेले. आणि

अनुक्रमणिका






गली तीन चार वर्षे प्रभाकर अत्रे 'दीपावली'-च्या संपादनाची धुरा श्री. दलालांबरोबर निष्ठेने व सातत्याने वहात आहेत. १९४८–४९ पासून 'दीपावली' च्या आंतरिक साहित्यिक मांडणीचे रंगीत चित्रांचे स्वरूप अधिक लालित्यपूर्ण व मनोहर झालेले दिसते व ते निरनिराळ्या टप्प्यांवर अधिकाधिक डौलदार, भारदस्त, रसमय व वाङमयसमृद्ध होत गेले आहे. १९५२ सालच्या दिवाळी अंकामध्ये आचार्य अत्र्यांची एक मजेदार कविता आहे तर त्याच अंकामध्ये कुसुमाग्रज व मंगेश पाडगांवकर या कविश्रेष्ठांचे दोन लघुनिबंध प्रसिद्ध झाले आहेत. दुर्गाबाई भागवतांनी 'लोकसाहित्या'वर लिहिले आहे तर बहिणाबाई चौधरींची 'माझ्या जीवाचा मंतर' ही कविता याच अंकात समाविष्ट आहे. १९५३ च्या दिवाळी अंकात मंगेश पाडगांवकरांची सुप्रसिद्ध 'जिप्सी' ही कविता प्रसिद्ध झाली आहे, तर दि. के. बेडेकरांचीही एक कविता त्याच अंकात आहे. उलट नवकवींचे विडंबन करणारी कविता याच अंकात सोपानदेव चौधरी लिहून जातात. १९५४ च्या दिवाळी अंकात स. आ. जोगळकरांचा 'शृंगारनायिका' हा रसीला ललित लेख आहे व त्या लेखाला दलालांच्या कुंचल्यातून अवतीर्ण झालेल्या नऊ शृंगार नायिकांची रंगसरूपमय मनोहर साथ आहे. विजय तेंडुलकर हा नव्या दमाचा कथा लेखक याच अंकात झळकताना दिसतो तर गोमंतकाचे श्रेष्ठ विचारवंत काशिनाथ दामोदर नायक या अंकाला आपल्या 'गोमंतक संस्कृती' या वैचारिक लेखान समृद्ध करतात. याच अंकात आणखी एक वैशिष्टय आढळते ते म्हणजे विभावरी शिरूरकरांची 'दोघांचं विश्व' ही कादंबरिका ! शिवाय अच्युत बर्वे यांची खानदानी व खास त्यांच्या ढंगाची व रंगाची कथा हे या खास अंकांचे आणखी एक वेगळेपण आहे. . . नाविन्य, वाढते व जाणते नाविन्य, नित्य नूतनता हे यापुढील सर्व 'दीपावली'च्या खास दिवाळी अंकांचे अंग बनून जाते. १९५५ साली संपादकानी एक अभिनव उपक्रम अमलात आणला; अपूर्व असा ! या अंकात आघाडीवरच्या कथालेखकांच्या कथा निनांवी प्रसिद्ध करण्यात आल्या असून अंकाच्या शेवटी वाचकांसाठी एक योजना जाहीर करण्यात आली आहे. आपल्या आवडीनिवडीनुसार केवळ गोष्टींच्या गुणावरच वाचकांनी आरंभी दिलेली कथालेखकांची नावे त्या त्या कथेबरोबर जुळवायची अशी ही योजना ! हेतु : "दीपावली'च्या वाचकवर्गाची आवडनिवड अजमावून त्या प्रकाशात पुढील वाटचाल आखणे. व एकूण कथावाङमयाच्या दृष्टीने सामान्य वाचकाच्या बदलल्या आवडीनिवडीचे मोजमापही यात मिळाले तर फायदा होणार आहे." (अवतरण चिन्हातील माझे). 'दीपावली' परिवारात पु. ल. देशपांडे प्रथमच आपली हजेरी लावतात तीसुद्धा याच अंकात. 'नवरस आमच्याकडेही आहेत' असे बजावणारी 'पु. लं.ची 'बटाट्याची चाळ' एका संगितीकेच्या स्वरूपात याच अंकातून रसिकांसमोर आली आहे. 'केशवसुत, नवचित्रकार आणि तुम्ही' हा गाडे, मोहन सामंत, गायतोंडे, पळशीकर, लक्ष्मण पै, या नवचित्रकारांच्या लेखणीतून रंगलेला aesthetic ecstacy ची अनुभूती व अवस्था शोधणारा सौंदर्यसमीक्षात्मक परिसंवाद हे आणखी या अंकाचे नवेच आविष्करण ! या अंकाचे आणखी एक नावीन्य म्हणजे 'महाराष्ट्र देश सुंदरा' हा महाराष्ट्र ही काय चीज आहे ते सांगणारा ढंगदार परिसंवाद ! ही परिसंवादाची प्रथा नंतरच्या 'दीपावली' अंकातून चालू रहाते. मं. वि. राजाध्यक्ष, ग. रा. कामत, व्यंकटेश माडगूळकर, पु. भा. भावे, पु. ल. देशपांडे, बा. भ. बोरकर, मंगेश पाडगांवकर, सोपानदेव चौधरी व शांताराम सवनीस यांनी हा परिसंवाद आपल्या चाणाक्ष वैचारिकतेने व प्रतिभाविलासाने कमालीचा रंगतदार केला आहे. या अंकात जसे इरावती कर्वे, श्री. म. माटे व न. वि. गाडगीळ यांचे खुमासदार व शैलीदार ललित लेख आहेत तद्वतच 'दीपावली'ला वैज्ञानिक शास्त्रीय विषयावरील लोकशिक्षणात्मक ललित लेखाचेही वावडे नाही हे दाखविणारा ना. वा. कोगेकरांचा वैज्ञानिक लेख याच अंकात आहे.

### आधी केले, मग सांगितले

१९५६ च्या 'दीपावली'च्या खास दिवाळी अंकाने 'दीपावली'ला एक तप पूर्ण झाले आहे. या अंकातील दीनानाथ दलालांचे 'आधी केले; मग सांगितले हे निवेदन प्रारंभीच लक्ष वेधून घेते. या निवेदनातून संपादक डोकावतात व म्हणूनच

राजकारणातला भे' सूर '




' रविंद्र सरोवर ' प्रकरणी बंगाल सरकारने कानावर हात ठेवले








त्यातील महत्त्वाचा भाग मी येथे उद्धृत करीत आहे. प्रेमाचा ऋणनिर्देश करण्यासाठी आपण लेखक व वाचक यांच्यामध्ये क्षणभर उभे आहोत असे सांगून श्री. दलाल लिहितात, "एक तप झाले. 'दीपावली'ची कल्पना एका सु-संध्याकाळी सुचली; त्या गोष्टीला बारा वर्षे होऊन गेली. दिवाळीच्या निमित्ताने वेचक ललित-साहित्य आणि आकर्षक चित्रकृती यांनी विनटलेला अंक अभिरुचिसंपन्न वाचकांच्या हाती द्यावा अशी स्थूल कल्पना त्यावेळी मनात होती. नवनवीन प्रयोगांनी तिला मूर्त स्वरूप देण्याचा यथाशक्ति प्रयोग गेली बारा वर्षे करीत आलो. वाचकांनी या प्रयोगाचे सहर्ष स्वागत नेहमीच केलेले आहे...' हे व आणखी बरेच काही सांगून पुढे दलाल लिहितात, 'दीपावली' हे मराठीतले पहिले वार्षिक. ज्या काळात ते सुरू झाले तेव्हा दिवाळी अंक ही साप्ताहिकांची आणि मासिकांची मिरासदारी होती. रूढ संकेत डावलूनच 'दीपावली'ला आपला प्रपंच थाटावयाचा होता. पण हा प्रपंच 'नेटका' झाला आहे हे सांगण्यास आनंद वाटतो. वार्षिकांची प्रथा आता सर्रास रूढ झालेली दिसते...' तत्पूर्वी संपादन क्षेत्राबद्दल लिहिताना दलाल म्हणतात, ' संपादन-प्रकाशनाचे क्षेत्र हे खरोखरच मला अनोळखी होते. 'दीपावली'च्या प्रसिद्धीपूर्वी वर्ष-सहा महिने जरी कुणी तसे भविष्य वर्तवले असते तर मी त्याला वेड्यात काढले असते. संपादक होण्याची महत्त्वाकांक्षा मी



कधीच बाळगली नव्हती. साहित्याशी माझा संबंध केवळ वरवरचा! पण मला या क्षेत्रात ओढून आणण्याचे श्रेय श्री. रॉय किणीकरांचे ' तर आपल्या चित्रकलेच्या प्रांताबद्दल दलाल लिहितात, "साहित्य हा माझा प्रांत नव्हे. पण चित्रकला हा माझा प्रांत आहे असे म्हटले तर माझ्यावर अहंमन्यतेचा आरोप कुणी करणार नाही असे वाटते. अंकाची मजावट आकर्षक व्हावी आणि एक वा बहुरंगी चित्रकृती शक्य तेवढ्या उत्कृष्टप्रकारे वाचकाच्या दृष्टीपुढे ठेवाव्यात यासाठी 'दीपावली'ने सुरुवातीपासूनच अत्यंत कटाक्ष ठेवला आहे. 'दीपावली'च्या आधी रंगीत चित्रकृती देण्याची पद्धत नव्हती असे मला सुचवायचे नाही. पण चित्रांची संख्या, चित्रांना सूत्रबद्ध करणारी विषयांची योजना आणि चित्रकाराचा हेतु सफल होईल इतकी आकर्षक छपाई यासाठी फारसे परिश्रम घेण्याची प्रथा मराठी नियतकालिकात नव्हती. 'दीपावली'ने याकडे विशेष लक्ष पुरवले. चित्रे काढण्याच्या पद्धतीपासून तो ती छापण्याच्या पद्धतीपर्यंत सर्व क्षेत्रात 'दीपावली' नेहमीच प्रयोगशील राहिली; कित्येक वावतीत आघाडीवरही राहिली. मराठी नियतकालिकांनी न चोखाळलेले कित्येक मार्ग 'दीपावली' ने वाचकांच्या निदर्शनास आणून दिले. 'वूड कट्स्' 'लिनोकट्स्' 'इचिंग' या पद्धती 'दीपावली' ने कित्येक वर्षापूर्वी हाताळल्या. नेहमीची तिरंगी छपाईची पद्धती मूळ चित्रकृतीतला गोडवा पुरेसा उतरू शकत नाही हे दृष्टोत्पतीस येताच 'ऑफ्सेट' छपाईचा मार्ग 'दीपावली'ने प्रथम अंगिकारिला. 'ग्रानूर' पद्धतीच्या 'काश्मीर-रेखाचित्रांचा उल्लेख याच संदर्भात करता येईल...' एवढे सांगून आपला मुद्दा भक्कम करण्यासाठी त्याच अंकात प्रसिद्ध झालेल्या 'लालन वैरागीण' या चित्रकथेचा संदर्भ दलाल देतात... आणि शेवटी 'दीपावली'च्या यशाचे मोठे श्रेय वाचकांना देताना दलाल लिहितात, "सुरुवातीपासून त्यांनी (वाचकांनी) 'दीपावली'चे स्वागत इतक्या उत्साहाने केले नसते तर 'दीपावली'ला इतकी वाटचाल करताच आली नसती! या अनोळखी वाटेवरले माझे पाऊल अजून मनाजोगे रुळलेले नाही. 'दीपावली' बंद करून टाकण्याचा वस्त आणि विरक्त विचारही अनेकदा मनात येतो! पण ज्ञात आणि अज्ञात वाचकांना 'दीपावली'-विषयी वाटणारी आस्था पाहिली म्हणजे माझा हा त्रागा, ही विरक्ती कुठल्या कुठेन पळू जाते आणि नव्या उत्साहाने मी कामाला लागतो

या पंचवीस वर्षात 'दीपावली' म्हणजे 'दीनानाथ दलाल' हे समीकरण मराठी वाचकांच्या मनात किती दृढ झाले आहे याची प्रचीती महाराष्ट्रात सर्वत्र येते. त्या दृष्टीने 'दीपावली'ची एका तपाची 'वाटचाल' सांगणारे हे खुद्द दीनानाथ दलालांचे निवेदन 'दीपावली' खास अंकाबद्दल खूप काही सांगून जात नाही काय?...

१९५६ पासूनची पुढील बारा वर्षांची.. म्हणजे 'दीपावली'च्या दुसऱ्या तपाची चढण-घडण टिपणवजा किंवा टाचणवजा काहीशी टिपता येईल ती अशी: एक स्थूल रूपरेषा लक्षात येण्याच्या दृष्टीने ती आवश्यकही आहे असे मला वाटते :—

१९५६:—'सिनिक'च्या कथा प्रथमच 'दीपावली'तून सुरू झाल्या.

—आजचे आघाडीवरचे विनोदी लेखक व नाटककार वसंत सबनीस यांची 'दीपावली'त प्रथमच उपस्थिती. त्यांच्या विनोदी द्विचरणी कविता व 'संदेश मराठी.. लोक मराठी' या परिसंवादातील लेख व 'कविसंमेलन' हे विडंबन काव्य!

—द. मा. मिरासदारांचे 'दीपावली'त पहिलेच आगमन: 'व्यंकूची शिकवणी' या गाजलेल्या कथेने!

—कै. बोवडचांच्या मार्मिक स्फुट काव्यपंक्ती.

—'लालन वैरागीण' ही प्रथमच प्रकट होणारी रंगीत चित्रकथा.

—कै. ज. के. उपाध्ये यांच्या अप्रसिद्ध कवितांना या अंकात प्रसिद्धी.

—पु. लं. ची 'गच्ची कुणाची' हा 'बटाट्याच्या चाळी'चा पुढील भाग.

–'रूप कथ्थक' यांची खास त्यांच्या ढंगाची कथा !

–इंडियन अकादमी ऑफ फाईन आर्टस्, अमृतसर–या संस्थेने सुवर्णपदक देऊन विभूषित केलेली दीनानाथ दलालांची कलाकृती 'अभ्यंगस्नान' याच अंकात प्रसिद्ध झाली आहे.

–मं. वि. राजाध्यक्ष, व्यंकटेश माडगूळकर, प्रा. अनंत काणेकर, वसंत सबनीस, रणजित देसाई वगैरेंनी रंगविलेला 'देश मराठी.. मराठीच भाषा'.. हा परिसंवाद.

१९५७:–'चित्र-दर्शिनी'ची नवी योजना.

–पु. ल. देशपांडे यांचा 'असा मी असा मी..' हा दीर्घ लेखन प्रकार !

१९५८:–'रसिक हो किती चतुर वायका! ही लेखमाला: (पु. लं. चा हात असलेला !)

–राजकीय व्यंगचित्रे: द्विभाषिक!..'

–ग. त्र्यं. देशपांडे यांचा 'अमरूशतक' हा रसिला लेख !

१९५९:–कै. गोपाळ कृष्ण भोबे यांचे या अंकाला प्रथमच लाभलेले संपादन सहकार्य !

–'माफ करा हं काही तरी गैरसमज होतोय !' ही थोरामोठ्यांनी रंगविलेली आगळी लेखमाला.

–'आधुनिक दशावतार' ही बाळ ठाकरे यांची राजकीय टीका-चित्रे. त्यांची 'दीपावली'त पहिलीच हजेरी !

–एक विग चित्रमाला: छक्कापन्दुतिः सादरकर्ते शां. शं. रेगे.

–'अन्तू बरवा' हे पु. ल. देशपांड्यांचे अमर झालेले व्यक्तिचित्र.

१९६०:–पु. लं. चा 'ववडू !

–मधुकर केचे प्रथमच 'स्पर्शाचे अभंग' घेऊन 'दीपावली'त यतात.

–ग्रेस कवीचे पहिलेच दर्शन: कविता: शिल्प.

–चित्रकार द. ग. गोडसे यांची 'पोत' सचित्र !

–मराठी माणूस: (१९२०–६०): परिसंवाद.

–डॉ. सरोजिनी वावर नव्यानेच दीपावलीत: लोकसाहित्याचा परिचय करून देतात.

१९६१:–विगचित्रमाला !

–कथाकारात श्रीराम कामत व रा. रं. बोराडे आपल्या कथा घेऊन प्रथमच 'दीपावली'त येतात !

–कवयित्री शिरीष पै यांची कविता 'दीपावली'त प्रथमच.

–द. ग. गोडसेंचा 'पोत' पुढे चालू.

–पु. ल. दशपांडेंचा 'पुन्हा मी: पुन्हा मी !'

–सौ. वसुंधरा पटवर्धन, जी. ए. कुळकर्णी, रणजित देसाई यांच्या कथा.

–शां. शं. रेगे यांचे 'आताशी मगाशी' व चित्रांवरील विनोदी 'काव्य'

१९६२:–मंगेश पाडगावकरांच्या 'वात्रटिका' 'दीपावली'तून प्रथमच

–पु. ल. देशपांडे: माझे खाद्य जीवन:

–सौ. शिरीष पै, पुरुषोत्तम धाक्रस, वामन चोरघडे, गोपाळ कृष्ण भोबे, मनोहर तल्हार, डॉ. दमयंती सरपटवार, पु. शि. रेगे यांच्या कथा (प्रथमच !)

## वार्षिक वर्गणीत वाढ

**पूर्वी जाहीर केल्याप्रमाणे गेल्या मार्च १९६९ अंकापासून 'दीपावली'ची वार्षिक वर्गणी पंधरा रुपये करण्यात आली आहे**

**— तथापि —**

**'दीपावली'च्या जुन्या सर्व वर्गणीदारांना त्यांच्या पूर्वीच्याच म्हणजे साडेबारा रुपये या वार्षिक वर्गणीची सवलत यापुढेही चालू राहणार आहे. मात्र त्यांनी नियमितपणे वर्गणी पाठविली पाहिजे, त्यात खंड पडू देता कामा नये.**

### मार्च १९६९ पासून वर्गणीचे नवे दर

| | |
|---|---|
| **वार्षिक वर्गणी** | **रु. १५** |
| **दोन वर्षांची वर्गणी** | **रु. २५** |
| **तीन वर्षांची वर्गणी** | **रु. ३०** |

तीन वर्षांची वर्गणी एकदम भरणारांना 'चित्रांजली', 'भारताचे भाग्य विधाते' व 'अमृतमेघ' या 'दीपावली'च्या प्रकाशनापैकी कोणतेही एक पुस्तक भेट म्हणून देण्याची योजना यापुढेही चालू राहील.

वर्गणी पाठविण्याचा पत्ता: **दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रिज, मुंबई–४**




—जयवंत दळवींचे पहिलेच दर्शन... 'एकाहून एक नग आहेत नग!' या विनोदी लेखासह! (पुढे त्यांच्या गाजलेल्या 'सारे प्रवासी घडीचे' या बहारदार कलाकृतीचा प्रारंभ!)

—'बरे झाले देवा!' हा थोरांचा आत्मकथन पर परिसंवाद: आचार्य अत्रे; द. वा. पोतदार, पु. भा. भावे, उदयशंकर, डॉ. सरोजिनी बाबर, चित्रकार मुरलीधर आचरेकर, रा. ज. देशमुख, माधव मंत्री, प्रभृतींनी रंगविलेला:

### सहा वर्षातील मानकरी

१९६३ पासून पुढील सहा वर्षे 'दीपावली' शब्द व रंग या माध्यमामधून प्रतिवर्षाला 'या नव नवल नयनोत्सवाची' नवता निर्मितीक्षमतेने धारण करते. 'साहित्य-कला-संस्कृती' हे 'दीपावली'चे ब्रीद प्रारंभीच लक्ष वेधते. या सहा वर्षात नव्या दमाच्या नव्या नव्या लेखकांना कथालेखकांना व कवि-कवयित्रींना मानाचे स्थान 'दीपावली'ने उत्साहाने दिलेले दिसते. आनंद साधले, वृन्दा लिमये, निर्मला देशपांडे, केशव मेश्राम, जितेंद्र अभिषेकी, दिलीप चित्रे, वि. वा. पत्की, सदानंद रेगे, प्रभाकर अत्रे, मा. कृ. पारधी, प्र. श्री. नेरुरकर, वसंत फेणे, रमेश मंत्री, विद्याधर गोखले, अरविंद ताटके, के. टी. देशमुख, शंकर रामाणी, पद्मा लोकूर, शांता शेळके, अं. दि. माडगुळकर, ना. व्यं. देशपांडे, सुरेश वेंगुर्लेकर, पद्माकर गोवईकर, राजाराम हुमणे, वा. रा. कान्त, ह. शि. खरात, शंकर सारडा, वसंत देशमुख, माधव राजवाडे, सूर्यकांत खांडेकर, अमर शेख, कृ. व. निकुंब, भास्कर उत्तरवार, वासंती गजेंद्रगडकर, वि. म. कुळकर्णी, शरच्चंद्र वासुदेव चिरमुले, व. पु. काळे, वा. रा. सोनार, प्रा. म. वा. धोंड, प्रा. म. ल. वराडपांडे, प्रभाकर पेंढारकर, मधु मंगेश कर्णिक, ग. व्यं. माडखोलकर, सोपानदेव चौधरी, सुभाष दळी, उमाकान्त कीर, अशोक परांजपे, ही या नावांची यादीच किती बोलकी आहे ती पहा. नेहमीची तीच तीच सदरे त्याच त्याच सारखेपणाने व कोरडेपणाने दिलेली 'दीपावली'त आढळून येत नाहीत. उलट दरवर्षी ती सदरे कोणते तरी नवेच, परिणत व मुललित स्वरूप घेऊन प्रकट होतात. म्हणूनच गेल्या पंचवीस वर्षातले 'दीपावली'चे दिवाळी अंक चाळताना दरवेळी एका नव्याच कलासाहित्यसंपन्न सृष्टीचा भाववृत्ती तरल करणारा व बौद्धिकतेला सचेतन करणारा समर्थ साक्षात्कार सतत होत रहातो. गेल्या पंचवीस वर्षात 'दीपावली'-नंतर 'दीपावली'चे अनुकरण करणारी अनेक वार्षिके निघाली व अजून निघतच आहेत; परंतु 'दीपावली'च्या अभिजात अभिरुचिसंपन्नतेची सर ह्यांपैकी कितीकाना येईल कुणाला ठाऊक! 'दीपावली'च्या दिवाळी खास अंकांचे स्वरूप हे असे आगळे वेगळे आहे! 'दीपावली'ने पु. भा. भाव्यांसारखा व त्यांच्या पिढीतील समर्थ व संपन्न कलाकार जसे महाराष्ट्राला दिले त्याचप्रमाणे अगदी अलीकडच्या उगवत्या पिढीतील समर्थ कथाकारांचाही एकप्रकारे शोध लावला व त्यांना त्यांचे हक्काचे मानाचे पान शिष्टाचाराचे कोणतेही 'शिष्ट' दंडक न घालता सहर्ष दिले आहे. 'दीपावली'ची प्रगतीशीलता, नव्या नव्यांच्या नवनवीन लेखन कामाठीचा दुर्दम्य शोध, कथेच्या जुन्या-नव्या आकृतीबंधापासून तो अत्याधुनिक प्रयोगक्षम अनाकृतिक लेखनापर्यंतची हाव व धाव, दर्जेदार विनोदाची जुन्या नव्या लेखकाकडून स्वीकारलेली निर्मिती व राखलेली गतिमान परंपरा, काल सुसंगत योजलेले व पार पाडलेले वैचारिक, आत्मकथनपर व ललित विषयांवरचे विदग्ध संवाद व परिसंवाद, रस व सौंदर्याची वेळोवेळी केलेली चिकित्सा व समीक्षा, काव्यात व कलेत साधलेली आकार व अनुभूतींची हळुवार परिवर्तने व परिमाणे, या अनेक अंगांनी व रंगांनी 'दीपावली' देवी सरस्वतीप्रमाणेच सालंकृत झाली आहे. मराठी साहित्याला व मराठी वाचकाला निःसंशयपणे तिने एक साहित्य, कला व जीवनाभिरुचीची संस्कृतीसंपन्न वाट दाखविली आहे; नव्हे, त्या वाटेवरून मराठी वाचकाचे व रसिकाचे बोट धरून तिने पंचवीस वर्षे सहेतुक व सफल अशी वाटचाल केली आहे. पाव शतकाची 'दीपावली'ची ही वाटचाल हा मराठी संस्कृतीतला व साहित्यातला एक अक्षर व अमर असा आविष्कार आहे. खरोखरच तो एक भावसुखद व बुद्धीप्रेरक चमत्कार आहे. तो जितका रसरंग रूपमय आहे तितकाच दीप्तीमान व तेजस्वीही आहे.

### अ–जून अंकाची अवीट गोडी

मार्च १९५९ सालापासून 'दीपावली' मासिक स्वरूपात निघू लागले आणि या मासिक स्वरूपातही ते कितीतरी लोकप्रिय झाले. दिवाळीखेरीज मासिकांचे अधूनमधून विषयानुसार खास अंक काढण्याची प्रथा कै. अनंत अंतरकर यांनी मराठीत सुरू केली व ती रसिकप्रिय पण झाली. 'दीपावली'चे मासिकात रूपांतर झाल्यावर ही प्रथा चालू ठेवण्यात आली. दिवाळीखेरीज निघालेल्या दीपावलीच्या खास अंकांचाही 'दीपावली'च्या रौप्यमहोत्सवी यशात मोठा वाटा आहे. दीपावली मासिकाचे वेळोवेळी निघालेले काही खास अंक कालानुसार पुढीलप्रमाणे आहेत:

(१) अभिनव महाराष्ट्र विशेषांक: ऑगस्ट १९५९: या अंकात रवीन्द्रनाथ टागोरांच्या 'शिवाजी उत्सव' या दीर्घ काव्याचा भावसुन्दर अनुवाद कविवर्य बा. भ. बोरकर यांनी केला आहे.

(२) खास क्रिकेट पुरवणी: (डिसेंबर १९५९: जानेवारी १९६०

(३) खास (प्रौढ) पुरुषांसाठी वर्षारंभ विशेष अंक: मार्च १९६०

(४) नव महाराष्ट्र राज्यमहोत्सव विशेषांक: मे १९६०.

(५) क्रांतिसंस्मरण विशेषांक: ऑगस्ट १९६०.

(६) भाषा भारती विनोद महोत्सव अंक: मार्च १९६१.

(७) नव महाराष्ट्र राज्य वर्धापन-दिन विशेषांक: मे १९६१.

(८) ऑगस्ट स्मृति सुमनांजलि विशेषांक : ऑगस्ट १९६१.

(९) खास क्रिकेट पुरवणी : डिसेंबर १९६१.

(१०) मुक्त गोमंतक विशेषांक : फेब्रुवारी १९६२.

(११) वर्षारंभ अंक : मार्च १९६२.

(१२) महाराष्ट्र राज्य वर्धापन दिन विशेषांक : मे १९६२.

(१३) विश्वकथा अंक : जून १९६२.

(१४) जय जवान विशेषांक : फेब्रुवारी १९६३. (भारतीय सेना व या सेनेची वेगवेगळी आघाडीची अंगे व त्यात सैनिकाला असलेले स्थान व त्याचा सन्मान याबद्दल मराठीत निघालेला अशा स्वरूपाचा हा पहिलाच खास अंक होता व ती परंपरा परवाच्या नौदल व वायूदल खास अंकावरोबर 'दीपावली'ने सजीव ठेवली आहे. 'नौदल' अंकाने तर नौदलापासून तो राजधानीपर्यंत श्रेष्ठींचे लक्ष वेधले गेले व वाचकांकडूनही या अंकाचा उत्स्फुर्त गौरव झाला.

(१६) कथा विशेषांक : जून १९६३.

(१७) प्रजासत्ताक दिन विशेषांक : फेब्रुवारी १९६४.

(१८) संपूर्ण विनोदी साहित्याने नटलेला वर्षारंभ अंक : मार्च १९६४.

(१९) कै. हरिभाऊ आपटे पुरवणी : एप्रिल १९६४.

(२०) वासंतिक कथा विशेषांक : जून १९६४.

(२१) विशेष विनोद अंक : मार्च १९६५.

(२२) विशेष कथा अंक : जून १९६५. (१९६५ साली 'दीपावली'ला भारत सरकारचे १९६५ चे श्रेष्ठता प्रमाण पत्र मिळाले : मराठीतील हे प्रमाण पत्र मिळविणारे ते एकमेव मासिक ठरले).

(२३) एव्हरेस्टवर घडलेल्या तेजस्वी क्रांतीचा गौरव-विशेषांक : ऑगस्ट १९६५.

(२४) आंतरराष्ट्रीय विनोद विशेषांक : मार्च १९६६.

(२५) संगीत विशेषांक : मे १९६६. ('दीपावली'चा संगीत विशेषांक हा सुद्धा कलेच्या या अतिरसाळ व सूक्ष्म नि भारदस्त दालनात केवळ डोकावून पाहाण्याचा उपक्रम नव्हता; तर संगीत-विश्वातील मान्यवरांचे सहकार्य घेऊन सामान्यांच्या अभिरुचीला नवी दिशा व नवी दृष्टी देणारा प्रयोग होता व आजही नियमितपणे हा प्रयोग चालू आहे. कै. भोवे, श्री. जितेंद्र अभिषेकी, श्री. वि. रा. आठवले वगरेंचे या अंकातील लेख याची साक्ष देतात.)

(२६) 'अ-जून' विशेषांक : ऑगस्ट १९६६ : 'अ-जून विशेषांक' हा 'दीपावली'ने साहित्य-सृष्टीला सादर केलेला एक अभिनव प्रयोग होता. 'अजून' या नावाने स्वतःला संबोधणाऱ्या एका मातबर साहित्यिक 'ग्रूप'ला हा अंक लेखन, साहित्य, संपादनासाठी वहाल करण्यात आला आहे. या 'ग्रूप'चे लेखक आहेत : वा. रा. कांत, सिनिक्, ना. व्यं. देशपांडे, यशवंत कानिटकर, य. दि. फडके, भास्कर उत्तरवार, माधव सराफ, नाफडे व 'ग्रूप' ची धुरा वाहिली आहे दा. गो. देशपांडे यांनी. 'दीपावली'च्या मध्ये हा 'अजून' एक प्रयोग या शीर्षकाखाली संपादक लिहितात,

"...अशा तऱ्हेने एका ग्रुपला हा अंक देण्यात नुसतेच वैशिष्ट्यपूर्ण प्रयोगिकतेचे समाधान नाही. ठेकेदारी वगैरे भाषेत साहित्यातील कोंडीची रड गाणाऱ्या अनकांना हा प्रयोग त्या दृष्टीनं निदान "अभिनव वाटेल" असं आम्हाला खात्रीपूर्वक वाटतं. विभिन्नतेत एकात्मता साधून आपलेपण कायम राखणाऱ्या आणि कुठल्याच चाकोरीत गिरगिरत न रहाण्याची चौकटीत न बसण्याची जिद्द बाळगून पुढे जाणाऱ्या वय, कृती विचार, शैली, अभिव्यक्ती, या सर्वांतील विभिन्नता कायम ठेऊन सहकारी वृत्तीने सांघिक भावनेने पुढल्या टप्प्यावर नजर खिळलेल्या ह्या मंडळींनी प्रत्यक्ष कृतीनेच अनेक प्रश्नांची उत्तरे दिली आहेत. हेच ह्या 'अ-जून' खास अंकाचे प्रयोजन '

(२७) खास कविवर्य केशवसुत पुरवणी : ऑक्टोबर १९६६.

(२८) वेस्ट इंडीज स्वागत क्रिकेट पुरवणी : डिसेंबर १९६६.

(२९) भारतीय नौदल दर्शन विशेषांक : फेब्रुवारी : १९६७. (या अंकाचे अंतर्बाह्य स्वरूप थेट आपल्याला भारतीय नौदलातच



अनुक्रमणिका

घेऊन जाते व आपुलकीने त्याचे अंतर्दर्शन देते).

(३०) हास्य-विनोद-विशेषांक : मार्च १९६८.

(३१) भारतीय सेना विशेषांक : मे १९६८.

(३२) कुटुंब नियोजन : विशेष पुरवणी: जानेवारी १९६९.

'दीपावली' मासिकाच्या इतर खास विशेषांकांची नामावली आणखीही वाढविता येईल; परंतु साधारणपणे संगीत, कथा, गणराज्य, क्रिकेट, विनोद, व भारतीय सेना, नौदल व वायुदल असे विशेषांक त्या त्या वर्षी त्या त्या महिन्यात नियमित प्रसिद्ध होत असतात. या सर्व अंकांचा साकल्याने विचार करण्यासाठी पुन: एक स्वतंत्र अभ्यासू लेख लिहिणे आवश्यक आहे. या सर्वच 'मासिक' विशेषांकांचे सर्वांगीण स्वरूप सुद्धा 'दीपावली' च्या दिवाळी अंकाइतकेच मनोहारी व साहित्यगुणसंपन्न असे आहे. हे सर्वच अंक म्हणजे कोणतीही अतिशयोक्ती न करता, 'दीपावली'चे छोटे 'दिवाळी अंक'च म्हणता येतील. दिवाळी अंकांची विविधता, नेत्रदीपकता व रंग-शब्दांची बहार हे या खास अंकांना पुरेपूर लाभली आहे. अलिकडे 'दीपावली' मासिकाच्या प्रथम पृष्ठावर एक सूत्र ठळक अक्षरात छापलेले सातत्याने आढळते. ते असे : **दीपावली: रसिक महाराष्ट्राचा साहित्य-कला-विलास :** हा कलाविलास हीच दीपावलीची गेल्या पंचवीस वर्षातील अमर सिद्धी आहे. दीपावलीला त्या दृष्टीने महाराष्ट्रातील स्वयंविमुक्त लोक विद्यापीठाची महनीयता प्राप्त झाली आहे, असेच कुणीही म्हणेल.

'दीपावली'चे गेल्या पंचवीस वर्षातील सर्वच मोठे छोटे खास अंक वर उद्धृत केलेले विरूद सर्वार्थाने सार्थ करतात यात संशय नाही. महराष्ट्रातील गेल्या पंचवीस वर्षातील सर्व सामान्य वाचकांपासून तो चोखंदळ समीक्षकांपर्यंत सर्वांची 'दीपावली'ने विलसित व विकसित केलेली रसिकता, अभिरुचि व बुद्धिमत्ता, हीच 'दीपावली'ची साहित्य व कला सृष्टीतील 'अमृतानेही पैजा जिंकणारी' कार्यसिद्धी आहे. 'दीपावली'च्या रौप्यमहोत्सवी वर्षामध्ये मागे वळून पाहणारा 'दीपावली'चा समंजस व अभिरुचिदक्ष वाचक 'दीपावली'चे हे श्रेय 'दीपावली'ला नम्र भावाने निश्चितच देईल व आणखी पुढील 'पंचवीस वर्षां'ची यशस्वी व वर्धिष्णु साफल्याची वाटचाल 'दीपावली'ला व 'दीपावली'च्या 'साधक' सूत्रधाराला मनोमन इच्छील यात नवल नाही. मराठी सारस्वताच्या दरबारातील हे 'दीपावली'चे खास अंक म्हणूनच कवळ एक देणेच ठरत नाहीत तर भावी अनेक पिढ्याना रिझविणारे, रंगविणारे व त्यांच्या प्रतिभाविलासाला प्रेरणा देणारे व दिशा दाखविणारे, शब्दरूपाला रंगरूप देणारे अमर लेणेच ठरणार आहेत, याबद्दल माझ्या प्रमाणेच 'दीपावली'च्या असंख्य वाचकांचेही दुमत होणार नाही. 'दीपावली'बरोबरच वाढलेल्या व वाङमयाभिरुची संपन्न झालेल्या माझ्या पिढीला तर जन्मभर 'दीपावली'च्या या ऋणातच रहाणे सदैव आवडेल.

● ● ●

---

( पृष्ठ ५ वरून ... **झाकीर हुसेन** )

**हुसेन यांनी ती कठीण कामगिरी एक देशकार्य या पवित्र भावनेने स्वीकारली आणि त्या संशयकेंद्रावरील संशयाचे सावट दूर झुगारून देण्यासाठी आटोकाट प्रयत्न केले. त्यात ते बऱ्याच मोठ्या प्रमाणात यशस्वीही झाले.**

**असा हा व्यवसायाने शिक्षक असलेला भारताचा नागरिक भारतातील परमोच्च पदावर–राष्ट्रपतीपदावर–अधिष्ठित झाला होता. त्यापूर्वी त्यांनी बिहारचे राज्यपालपदही भूषविले होते. डॉ. झाकीर हुसेन यांच्या पूर्वीच्या दोघाही राष्ट्रपतींना राष्ट्रपतीपदाच्या निवडणुकीत विरोधकांना तोंड द्यावे लागले होते, पण त्यांना झालेला विरोध हा केवळ तांत्रिक स्वरूपाचा अतएव नाममात्रच होता. डॉ. झाकीर हुसेन हे १९६७ च्या राष्ट्रपतीपदाच्या निवडणुकीसाठी देशातील अधिकारारूढ अशा कांग्रेस पक्षाच्या पाठिंब्याने निवडणुकीच्या आखाड्यात उतरले. त्यांना प्रखर विरोधाला तोंड द्यावे लागले. सर्व काँग्रेसेतर पक्षांनी एकजुटीने आपला उमेदवार उभा केला होता आणि तोही उच्चविद्याविभूषित आणि उच्चस्थानाधिष्ठित असाच नागरिक होता. पण डॉ. झाकीर हुसेन यांनी आपल्या या सामर्थ्यशाली प्रतिस्पर्ध्याचा पराभव करून निवडणूक जिंकली होती. या पदावर आल्याला अवघी दोनच वर्षे झाली होती. अशा स्थितीत निर्घृण काळाने त्यांना आकस्मिकरीत्या ओढून नेले हा दैवदुर्विलासाचाच प्रकार होय !**

**'दीपावली'ने नुकताच मे १९६९ चा अंक वायुसेनादल विशेषांक म्हणन प्रसिद्ध करण्याचे ठरविल्याबरोबर या उपक्रमाला राष्ट्रपतींच्या शुभेच्छा संदेशाच्या रूपाने आशीर्वाद मिळावा अशी इच्छा त्यांना कळविली होती. यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या 'भारतीय नौदल विशेषांक' आणि 'भारतीय सेना विशेषांक' या दोन्ही अंकांसाठी त्या त्या वेळच्या राष्ट्रपतींकडून शुभाशीर्वादाची अपेक्षा केली होती, पण एका प्रसंगी साधी पोहोचही मिळाली नव्हती तर दुसऱ्या वेळी राष्ट्रपतींच्या कार्यालयाने शुभेच्छा संदेश पाठविण्याला नकार दिला होता. त्यावरून अशा प्रकारे संदेश पाठवावयाचे नाहीत असा राष्ट्रपती-कार्यालयाचा संकेत असावा असेच आम्ही मानीत होतो; पण वायुसेनादल विशेषांकासाठी डॉ. झाकीर हुसेन यांचा आशीर्वाद 'दीपावली'ला लाभला हे येथे अभिमानपूर्वक नमूद केले पाहिजे. सदर संदेश मेच्या अंकात प्रकाशित झाला आहे. त्यावेळी यापुढच्याच अंकात या थोर नेत्याला श्रद्धांजली वाहण्याचा प्रसंग येईल असे स्वप्नातही वाटले नव्हते, पण काळाने तो प्रसंग आज आणला आहे. भारताच्या या दिवंगत सुपुत्राला आमचे कोटी कोटी प्रणाम !**

**– संपादक**












# संगीत सुसंवाद



श्री. कृष्णराव चोणकर
श्री. श्रीपादराव नेवरेकर
श्री. राम मराठे
श्री. रामदास कामत

**.... नाट्यसंगीताबद्दलच्या रसिकांच्या कल्पना आता बदलत आहेत....जुन्या जमान्यातील नाट्यसंगीताला नव्या काळातही तसचे मानाचे पान मिळेलच याची खात्री देववत नाही.**

## मराठी नाट्यसंगीत म्हणजे इंद्रधनुष्य

**— कृष्णराव चोणकर**

खास देवाची म्हणून काही देणगी असते. जन्म घेतानाच माणूस ती घेऊन येतो. ऐवज वापरावा तशी ती तो निगा राखत राखत वापरतो. त्याचं आणि देणगीचं भलं होतं. जीवाचा आटापिटा करून मुळात नसलेली देणगी कमवता येत नाही. देवाघरचं देणं हे देवाघरूनच घेऊन यावं लागतं. ते मागून मिळत नाही. श्री. कृष्णराव चोणकरांची ही ठाम श्रद्धा आहे. मराठी, हिंदी सिनेसृष्टी आणि मराठी, गुजराती रंगभूमीवर अखंड राबता ठेवीत ठेवीत चोणकरांनी परवा डिसेंबरात साठीचं दार ओलांडलं. आता सत्तरीच्या दालनात त्यांनी गात्या गळयाने प्रवेश केला आहे. उणीपुरी पन्नास वर्षे त्यांनी अस्सल घराणेवालं गाणं ऐकलं; देवदयेनं जमलं तेवढं रसिकांसमोर गुरुजनांची आठवण ठेवून पेश केलं. उन्हाळे, पावसाळे पाहिले. पानगळ पाहिली. पण साठ वर्षांच्या पुण्याईचा आढावा घेतला, तर वाटचाला फुलांचा बहरच अधिक आला अशी त्यांची धारणा आहे.

बालगंधर्व हाच मराठी रंगभूमीवरचा अनभिषिक्त गायनसम्राट होऊन गेला—आता असा सकलविद्यालंकृत नट पुनरपि होणे नाही असं चोणकरांना वाटतं. बालगंधर्वांनी असामान्य घराणेवाल्या खलीफांचं गाणं ऐकलं आणि प्रत्येकातलं चांगलं आणि स्वतःच्या गळयाला पेलेल ते स्वरबद्ध करून टाकलं. पै. अल्लादियाखाँसाहेबांची जयपूर घराण्याची अनवट गायकी त्यांनी मनःपूर्वक ऐकली. किराणा घराण्याचे पै. अबदुल करीमखाँ यांच्या गायकीतला स्वरांचा गोडवा त्यांनी उचलला. तीन घराण्यांची गायकी पचवलेल्या पं. भास्करबुवा बखले यांना त्यांनी गुरुस्थानी मानलं. ह्या सर्वांच्या घरंदाज गायकीच्या यथायोग्य प्रमाणातल्या मिश्रणाने गंधर्व गायकीचं अमृतरसायन सिद्ध झालं. शास्त्रीय संगीत आणि नाटयसंगीत हे एकाच महावस्त्राचे पदर आहेत; एकाचा धागा उसवला तर दुसऱ्याची नजाकत निघून जाईल हे बालगंधर्वांच्या नाटयसंगीतावरून दिसून येतं असं चोणकर म्हणतात.

ज्याला संगीट नट म्हणून नाव कमवायचं आहे, त्याने आपल्या गानविद्येत सतत भर टाकीत गेलं पाहिजे हा मुद्दा पटवून देताना त्यांनी पुन्हा बालगंधर्वांचाच दाखला दिला. नारायणरावांची अगदी सुरुवातीची ध्वनिमुद्रीत झालेली गाणी आणि नंतरच्या पोक्त वयात ध्वनिमुद्रीत झालेली गाणी ह्यांच्यात फरक दिसतो. नंतर नंतरच्या संगीतात नारायणराव झालेले स्पष्ट दिसतात. गायकीतली घट्ट लय हे त्यांना लाभलेले देवाघरचं देणं होतं. पण कान सतत जागृत ठेवून त्यांनी स्वरज्ञान सतत वाढवलं होतं. शास्त्रीय गायनाचा फारसा रियाज नारायणरावांनी केलाही नसेल. पण पं. भास्करबुवा आणि गोविंदराव टेंब्यांनी बांधलेल्या श्रुतिमनोहर चाली बसवता बसवता त्यांची विशिष्ट गायकी घट्ट झाली. एकेका चालीवर ते दोन दोन महिने सक्त मेहेनत घेत. रियाज करीत. आणि एकदा का चालीची त्यांनी पकड घेतली, की मग ती त्यांच्या चित्तात वज्रलेप होऊन जाई. रसिक त्यांच्या त्या अमृततुषारात न्हाऊन जात.

आज ती डोळस मेहेनत नवे नट करीत नाहीत अशी चोणकरांची तक्रार आहे. १९२२ साली त्यांनी 'स्वयंवरा'त बालगंधर्वांना प्रथम पाहिले, ऐकले. त्या क्षणापासून ते त्या दिव्य स्वराभिनयाने प्रभावीत झाले. पुढची चाळीस वर्ष चोणकरांनी गंधर्व गायकीचं मर्म आत्मसात् करायचा प्रयत्न करायचा. आज त्यांच्या गळयात ती गायकी









उतरली आहे. त्या नाट्य गायकीची दीक्षा त्यांनी इतरांनाही देण्याचा प्रयत्न केला. पण गंधर्व गायकीतले सूक्ष्म, तरल बेहेलावे, अनभ्यस्त गळ्यांवर यशस्वीरीत्या वसत नाहीत अशी त्यांच्या अनुभवाची गोळाबेरीज आहे. १९३८ साली ते गंधर्वांकडे नोकरीला राहिले. पाच सहा वर्ष नारायणरावांच्या मायेची ऊब त्यांना लाभली. परंतु ह्यापेक्षाही सतत तीन तपाहून अधिक काळ एका अलौकिक गायकीच्या धुंदीत आपण राहिलो, ह्याचीच त्यांना कृतार्थता वाटते.

श्री. रामदास कामतांबद्दल चोणकरांना फार आशा वाटते. हा उमदा, तरुण आणि स्वच्छ वाणीचा संगीत नट अधिक डोळस मेहेनतीने रसिकांना भारावून टाकू शकेल असं त्यांना वाटतं. कु. भारती वर्माच्या गळ्यावर एव्हापासूनच नीट संस्कार झाले तर तीही ठळक प्रकारचे यश मिळवील असे ते म्हणाले. मात्र एकूण संगीत नाटकाची ह्यापुढे शान वाढलेली दिसेल असा त्यांचा कयास नाही. अवघ्या तीन, साडेतीन तासात गुंडाळला जाणारा सध्याचा संगीत नाटकांचा मामला, सोनेरी पर्व उघडायला असमर्थ आहे; उलटपक्षी उलटलेले पान हेच मराठी रंगभूमीचे सोनेरी पर्व होते असंच म्हणावं लागेल असं चोणकरांचं अनुभवसिद्ध मत आहे. * *

## शास्त्रीय संगीताच्या वेलीवरचं मराठी नाट्य-संगीत हे फूल आहे — श्रीपादराव नेवरेकर

हा कोरडा वैशाख मागे पडेल. बघता बघता ओला आषाढ डोकावेल. ऋतुचक्राचं तेही ओलं पान पालटेल. वारा वहावा तशी दोन वर्षं निघून जातील. त्यावेळी साठी ओलांडून कृतकृत्य झालेले श्रीपादराव नेवरेकर आजच्याप्रमाणेच तेव्हाही सांगतील, "नारायण-राव बाल गंधर्वांपासून शांता आपटेपर्यंत ज्यांनी ज्यांनी गेल्या अर्ध शतकाच्या काळात प्रमुख स्त्री भूमिका करून मराठी रंगभूमी गाजवली, त्या त्या सर्व नायिकांबरोबर मी हीरोच्या भूमिका करून टाळ्या घेतलेल्या आहेत." आणि ह्यात काहीही असत्य नाही. रघुवीर सावकारांच्या प्रोत्साहनाने त्यांच्याच "रंगबोधेच्छु" नाटक मंडळीच्या रंगमंचावर उभे राहिलेले संगीत नट श्री. नेवरेकर, हे आजतागायत मराठी रंगभूमी आपल्या खड्या आवाजीन गाजवत आहेत. बालगंधर्व, हिराबाई, कर्नाटकी भगिनी, जयमाला शिलेदार, मीनाक्षी, अशा सर्व तोलदार नामवंत नायक मंडळींच्या बरोबर सतत चाळीस, पन्नास वर्षं नेवरेकरांना तोडीस तोड काम करून धुंद प्रेक्षकांकडून मानाचे मुजरे घेतले आहेत. मात्र हे यश केवळ दैवाने आलेले नसून त्यांची शास्त्रीय संगीताची जी जाण दिवसेंदिवस वाढत गेली, त्याचा अनुकूल परिणाम त्यांच्या रंगभूमीवरील गायना-वर झाला, अशी त्यांची धारणा आहे. खाँसाहेब खादीम हुसेनखाँ आणि तानरस घराण्याचे इनायत हुसेनखाँ ह्याची शागिर्दी त्यांनी बरीच वर्षे केलेली आहे.

शास्त्रीय संगीताशिवाय नाट्यसंगीत संभवतच नाही असे नेवरेकरांचे ठाम मत आहे. सर्वच संगीत विद्या ही एक अलौकिक उपज असते आणि गाणारा हा जन्मजातच असावा लागतो अशी त्यांची श्रद्धा आहे. मुळात गळ्यात सच्चा सूर हवा. शास्त्रोक्त रियाज करून त्याच्यावर ताबा ठेवता आला पाहिजे. इच्छेप्रमाणे तो हवा तसा वाकवता आला पाहिजे. हे जो करील तोच उत्तम संगीत नट होईल आणि त्याच्या यशाची उत्तुंग इमारत शास्त्रोक्त संगीताच्या पक्क्या पायावर चढवलेली असेल. जो शास्त्रापासून फारकत करील, त्याला संगीत नाटकात यश मिळणार नाही अशी नेवरेकरांची धारणा आहे. संगीतातला स्वयंप्रकाशी युग पुरुष हीच बालगंधर्वांची खरी योग्यता आहे.

ते म्हणाले की बालगंधर्व म्हणजे मराठी रंगभूमीवरली देवताच होती. नेहेमीच त्यांचा आवाज उत्तम लागे. ते मोठ्या समजुतीने भाव-नेचा परिपोष करीत करीत, पदातले शब्दोच्चार स्वच्छ करीत. त्यांना शास्त्रीय संगीतातल्या कायद्याचं उत्तम भान होतं. आणि त्यामुळे बालगंधर्वांच्या नाट्यसंगीतावर रसिक फिदा होत. आता मराठी रंगभूमीवरले संगीत नट शास्त्रीय संगीताची तेवढी तमा बाळगीत नाहीत. त्यामुळे रंगभूमीच्या क्षितिजावर वेगाने येत असलेले मात-बर नट आता दिसत नाहीत. आहेत त्यांच्यात श्री. रामदास कामत हा मात्र भविष्यकाळात विलक्षण कर्तबगारीचा झळाळ दाखवणार, असा त्यांचा अंदाज आहे. रामदास कामत ह्यांना श्रीपादराव नेवरेकर मराठी संगीत रंगभूमीचं आशास्थान मानतात.

तीन वर्षं नेवरेकरांनी गंधर्व नाटक मंडळीची मालकी संभा-ळली. त्याच्या अगोदरच ते गंधर्व नाटक मंडळीत नोकरीलाच होते. बालगंधर्वांनी आपल्याला फार सन्मानाने वागवलं असं ते सांगतात. इतकंच नव्हे, तर नेवरेकर कंपनीतून बाहेर पडायच्या वेळी 'कान्हो-पात्रा'त नेवरेकर रंगून गात होते, तर त्याला विरोध न करता बालगंधर्वांनी इतरांना सांगितलं, "देवा, उद्यापासून कुठे असणार आहे तो? गाऊ दे, त्याला मनसोक्त गाऊ दे!" बालगंधर्वांना अनेक दैवी देणग्या होत्या. उत्तम गायन, उत्तम पाठांतर, उत्तम शब्दोच्चार आणि भलाईने जोडलेलं रसिकांचं कौतुक, ह्या त्यापैकीच, असं त्यांचं मत आहे.

लोकांच्या नाटकाबद्दलच्या आवडीनिवडी बदलत आहेत, नाट्य संगीताबद्दलच्या जुन्या कल्पनाही आता कुणी बाळगीत नाहीत, असं सांगून ते म्हणाले की आजच्या जमान्यातला सर्वात श्रेष्ठ नाट्यसंगीत दिग्दर्शक श्री. जितेंद्र अभिषेकीच आहे; त्यांच्या संगी-तात घरंदाजपणा आहे; रंजकता आहे. पण असा एखाद दुसरा सन्मान्य अपवाद वगळता, मराठी नाट्यसंगीताला ह्या पुढच्या काळात फार मोठे भवितव्य आहे, असे त्यांना बिलकूल वाटत नाही. जुनी नाटकं तर कुणाला पेलतच नाहीत; केशवराव दाते यांच्या-सारखा उच्च कोटीचा अभिनय कोणी करत नाही, असं सांगताना नेवरेकर म्हणाले, ही जुनी घरंदाज नाटकं आमच्या पिढीनंतर अस्ताला गेलेली दिसतील !

असं न घडो; नेवरेकरांसारख्या तपस्वी कलाकारांची पिढी इतक्यातच शस्त्र खाली न ठेवो; आणि जुन्यातलं सोनं वेचण्याची आणि ते सांभाळून वापरण्याची प्रेरणा उगवत्या पिढीला होवो, अशीच त्यांच्या आणि मराठी रंगभूमीच्या चाहत्यांची मनःकामना असणार !

* *









अनुक्रमणिका

# सारा जीव घरंदाज गायकीत अडकला आहे—राम मराठे

सागराचं भरतीचं पाणी वाव मिळेल तिथे शिरून फेसाळत राहातं, तसं श्री. राम मराठे यांच्या संगीत नैपुण्याबद्दल झालेलं आहे. त्यांनी चित्रपटात अभिनय करून गाणी म्हटली, पदांच्या ध्वनिमुद्रिका दिल्या, शास्त्रोक्त संगीताच्या बैठका केल्या, आकाशवाणीच्या सर्व केंद्रांवरून जलसे केले, पार्श्वगायक म्हणून कामगिरी केली, रंगभूमीवर संगीत हीरो म्हणून नाव कमावलं, आणि आता रंगभूमीचे आघाडीचे संगीत दिग्दर्शक म्हणून लोकप्रियता मिळवली. ह्यापैकी प्रत्येक दालनात त्यांनी चमक दाखवलेली आहे. त्यांचं 'गोपाळकृष्ण' चित्रपटातलं गोड काम कोण विसरेल ? गणेशोत्सवातल्या तुफान गर्दीपुढे, मुंबईच्या ब्राह्मण सभेत त्यांच्या रंगलेल्या मैफली वर्षोन् वर्ष न चुकता ऐकलेले रसिक हजारोनी आहेत. साध कार्यक्रम सोडा, पण राष्ट्रीय कार्यक्रमही त्यांनी आकाशवाणीवरून वारंवार सादर केलेले आहेत. मानापमान, संशयकल्लोळ, सौभद्र, स्वयंवर ह्या नाटकातल्या त्यांच्या संगीत भूमिकांनी प्रेक्षकांवर वारंवार जादू केलेली आहे आणि मंदारमाला, मेघमल्हार ह्या नाटकातले त्यांचे गायन आणि संगीत दिग्दर्शन यशश्री कमावणारे ठरले हा तर आजचाच इतिहास आहे.

रामभाऊंचा वडीलोपार्जित धंदा खानावळीचा. वडीलांच्या पश्चात् त्यांनी ती पुणेरी खानावळ चालवण्याचा यत्नही केला. पण नियतीने त्यांचे पान संगीताच्या भव्य दालनात मांडून ठेवले होते. साहजिकच, वडीलोपार्जित धंद्याला रामराम ठोकून ते गाण्याच्या नादाला तबलजीच्या भूमिकेवरून लागले. प्रभात फिल्म कंपनीतही त्यांनी कुमार नट म्हणून नाव कमावले. गोपाळ गायन समाजात उमेदवारी केली. कै. मिराशी बुवा, मा. कृष्णराव, वामनराव सडोलीकर, मनहर बर्वे ह्यांच्यापाशी त्यांनी गायन विद्येतले पहिले श्रीकार घातले. हळू हळू शास्त्रीय संगीतातले मर्म त्यांना उकलू लागले. नामांकित गवयांची गाणीही त्यांनी बहुत ऐकली.

ह्या सर्व उमेदवारीचा उपयोग रामभाऊंना आपले रंगभूमीवरचे गायन चटपटीत आणि सौंदर्यपूर्ण करण्याकडे झाला. शास्त्रीय संगीताच्या शिक्षणाचा ठाम पाया होता, म्हणून ते रागदारीयुक्त नाट्यसंगीत लीलया गाऊ लागले. बालगंधर्व, सवाई गंधर्व, मा. कृष्णराव, ह्यांचे रंजक गायन त्यांनी तृप्तीने ऐकले आणि पचवले आहे.

ज्याला गायचं आहे, मग ते बैठकीतलं गाणं असो अगर रंगभूमीवरलं पद गाणं असो, त्याने कसून सक्त मेहेनत केली पाहिजे; रंजक गायकी घोटवली पाहिजे; अस्ताई अंतरे गळ्यात बसवले पाहिजेत असं रामभाऊंचं स्वानुभवावर आधारलेलं मत आहे. कलावंत वशिल्याने फारसा पुढे येऊ शकणार नाही. यदाकदाचित पुढे आलाच, तर गुणाभावी तो दुप्पट वेगाने मागे फेकला जाईल. त्याची त्या गर्तेतली अवस्था केविलवाणी होईल. कलावंताची आणि तशातही रंगमंचावरल्या गायक कलावंताची परीक्षा रोजच्या रोज होत असते. त्या परीक्षेत जो उतरेल, त्याने प्रसिद्धीची काळजी करण्याची जरूरी नाही, ती स्वतः होऊन त्याच्या पायाशी येणारच असं रामभाऊंचं सांगणं आहे.

गंधर्व नाटक मंडळीचे कै. गणपतराव बोडस आणि साहित्य संघाचे कै. डॉ. भालेराव ह्यांनी रामभाऊंना नाटकात उभे केले. तेव्हापासून ते अगदी आजतागायत ते रंगभूमीवर यशस्वी रीतीने वावरत आहेत. मात्र प्रसिद्धीपेक्षा वेगळ्या तऱ्हेचे गायन जमवायला संधी मिळावी म्हणून ते रंगभूमीवर उभे राहिले. 'मंदारमाला'चे संगीत दिग्दर्शन करून त्यांनी आपल्या यशोमंदिलावर मानाचा तुराच खोवला. नाटककार विद्याधर गोखल्यांची इच्छा होती की नाटकातल्या नायकानेच गीताना चाली द्याव्यात. रामभाऊंनी मित्रकर्तव्य म्हणून ते काम केलं आणि पर्यायानं मराठी रंगभूमीला एक समर्थ आणि लोकप्रिय संगीत दिग्दर्शक लाभला. 'जयशंकरा गंगाधरा' हे गाण सर्वत्र लोकप्रिय झाले.

मात्र रामभाऊंचे एक मन शास्त्रीय संगीतात कायमचे गुंतून राहिलेले आहे. क. जगन्नाथबुवांची घरंदाज शागिर्दी रामभाऊंनी तनमनधन वेचून केली. सध्या ते पुनरपि मा. कृष्णरावांकडे शिकू लागले आहेत. जीव ह्या घरंदाज गायकीत अडकल्यामुळे नाटकांच्या नव्या जबाबदाऱ्या ते टाळू लागले आहेत; पण आपण वाट पाहूया ! उत्तमोत्तम गायकी पचवून ते उत्तेजित होतील आणि आपल्या अमोघ विद्येने नाट्यसंगीताचे नवे, पक्के, आणि घराणेदार रसायन लवकरच सिद्ध करतील !

* *

## ओळखा पाहू ?

'दीपावली'च्या मे १९६९ च्या वायुसेनादल विशेषांकाच्या पृष्ठ २३ वर 'ओळखा पाहू' या शीर्षकाखाली एका विमानाचे छायाचित्र छापले होते आणि ते विमान कोणत्या जातीचे आहे हे ओळखण्यासाठी वाचकांना आवाहन केले होते. या आवाहनाला वाचकांनी जोरदार प्रतिसाद दिल्याने 'दीपावली'कडे बरीच उत्तरे आली आहेत आणि अजूनही येत आहेत. त्याचे अधिकृत उत्तर आणि ते अचूक ओळखणाऱ्या वाचकांची नावे पुढील अंकी प्रसिद्ध करण्यात येतील.

— संपादक

अनुक्रमणिका






# नाट्यसंगीतात नक्कल नको, स्वतंत्र शैलीचे अस्सल हवे — रामदास कामत

सकाळचं स्वच्छ सोनेरी ऊन खिडकीतून घरांत यावं, मग जसं प्रसन्न वाटतं, तसा अनुभव गद्य मजकरातून एकदम रामदास कामतांचं पद सुरू झालं की येतो. मराठी रंगभूमीवरल्या नव्या दमाच्या संगीत नायकांत ते आज अग्रेसर आहेत. त्यांच्या आवाजीला एक प्रकारचं घरंदाज देखणेपण लाभलेलं आहे. स्वतंत्र घाटाच्या गायकीकडे त्यांची दौड चालू आहे. हे सगळं कसं जमलं ? रामदास कामत त्याचं सगळं श्रेय आपल्या कुटुंबियांना देतात. खाऊन पिऊन सुखी असलेले त्यांचे वडील कै. शांताराम रायु कामत हे गोमंतकातल्या हौशी गायक नटांपैकी एक प्रमुख असामी. सांखळीच्या श्री दत्त महाराजांचे कामत हे उपासक. तिथे होणाऱ्या सर्व उत्सवात गाणं गाऊन देवाची सेवा करणं हे परंपरागतच काम त्यांनी केलं. रामदास कामतांची आई म्हणजे श्रीपादराव नेवरेकरांची चुलत वहीण. संगीत हा नेवरेकर घराण्याचा वारसा. तोच रामदासांच्या आईकडे आला. ती घरगुती वातावरणात गायची. आईवडीलांची ती देणगी संक्रात झाली त्यांच्या मुलांमध्ये. मोठा उपेन्द्र घरंदाज गायकी घोटतो. त्यानेच रामदासला दीक्षा दिली. शास्त्रीय गायकीचं अंतरंग उलगडून दाखवलं. नाट्यसंगीत कसं वठवायचं त्याचं वळण घालून दिलं. आजही रामदास उपेन्द्र ह्या थोरल्या भावाचीच शागिर्दी करतात. संगीतातलं अस्सल काय आणि वेगडी काय त्याची जाण उपेन्द्रांनीच करुन दिली असं ते कृतज्ञतापूर्वक सांगतात.

शास्त्रीय संगीताचा पायाभूत भक्कम आधार नसेल तर नाट्यसंगीत फुलणारच नाही असा त्यांचा दावा आहे. अगोदर शास्त्रीय संगीताची उत्तम समज गायकाला आली पाहिजे. मग त्या कशिद्यावर तो पदगायकीचं वीणकाम करू शकेल. ह्या बाबतीतलं आदर्श उदाहरण म्हणून "कट्यार काळजात घुसली" ह्या नाटकातलं 'घेई छंद मकरंद' ह्या पदाचा ते निर्देश करतात. सालग वराळी ह्या रागावर ते संगीत दिग्दर्शकाने बांधलेलं आहे. आता सालग वराळी ह्या दाक्षिणात्य रागाचा अस्ताई अंतरा जर गायकाला माहीत नसेल, तर ह्या पदाला तो काय न्याय देणार ? म्हणून शास्त्रीय संगीताची बैठक रंगभूमीवरल्या गायकाकडे हवीच. बालगंधर्व, दीनानाथांकडे ती भक्कम स्वरूपात होती आणि छोटा गंधर्वाकडे ती आहे. म्हणूनच प्रेक्षकांच्या काळजाला झोंबणारं नाट्यसंगीत त्यांनी निर्माण केलं असं रामदास कामत म्हणतात. मात्र एका गोष्टीचं त्यांना राहून राहून कोडं वाटतं की पूर्वीचे संगीत नाटक अर्धा-पाऊण तास एक एक पद घोळवून घोळवून म्हणत, तेव्हा नाटकातल्या नाट्याचं काय होत असे ? संगीताच्या वेदीवर नाट्याचा बळीच देत असले पाहिजेत, कारण तीस चाळीस मिनिटं पद तिंबवलं, तर प्रेक्षकांचं मूळ नाट्यवस्तुवरचं अवधान नाहीसंच होणार. आणि नाटकाचा आत्मा नाट्यात असतो; निव्वळ संगीतात नाही.

नाट्यसंगीत हे मुळातल्या नाटकातील नाट्याचा परिपोष करणारंच असलं पाहिजे असं सांगून रामदास म्हणाले की त्यांची पदं नाट्यहेतूचा भंग होतील अशा रीतीने ते कधीच गात नाहीत. योग्य त्या सीमेवर गाणं आवरतं घेऊन गद्य संभाषणाचा ओघ चालू ठेवण्याचा ते कटाक्ष ठेवतात. त्यामुळे त्यांचं पदगायन फार बांधेसूद असतं. त्यात लंपावळ आणि तानांची आतषबाजी तर कधीच नसते. तसंच, मराठी रंगभूमीवरलं नाट्यसंगीत पाश्चात्य हलक्या फलक्या संगीतापासून कटाक्षानं दूर ठेवलं पाहिजे अशी त्यांची धारणा आहे. ती जबाबदारी संगीत दिग्दर्शकाची आहे. त्या दृष्टीने श्री. जितेंद्र अभिषेकी हे आधुनिक मराठी रंगभूमीवरचे क्रांतीकारकच आहेत असं श्री. कामत मानतात. पूर्वीच्या पिढीतले नट ही कुणाची तरी नक्कल करत. कुणी बालगंधर्वांची करायचा तर कुणी दीनानाथांची करायचा. तथापि, नक्कल म्हणजे नक्कल. ते कथिल उघंड पडायचं. जितेंद्र अभिषेकी हा असा संगीत दिग्दर्शक उगवला की ज्याने त्या जुन्या चाकोऱ्या मोडून टाकल्या आणि शास्त्रीय संगीताच्या पार्श्वभूमीवर आधारलेलं स्वतंत्र शैलीचं खानदानी नाट्यसंगीत रंगभूमीला दिलं. अभिषेकींच्या चालींवर त्यांचा असा स्वतंत्र ठसा आहे. आणि म्हणून त्यांना उज्ज्वल भवितव्य आहे असं कामत म्हणतात.

ठिक आहे; एक गुणी मराठी कलावंत दुसऱ्या गुणी मराठी कलावंताच्या बलस्थानाचा आदरपूर्वक गौरव करतो, हे दृष्यच मोठं आशादायक आहे. अभिषेकी-कामत ही जोडी ह्यापुढे काय तरवार मारते, इकडे रसिकांचं लक्ष केव्हापासून लागलेलं आहे. त्यांच्या यशामुळे मराठी रंगभूमीची शान वाढो, ह्यापरती रसिकांची दुसरी कसली इच्छा असणार ?

**[श्री. रवींद्र पिंगे यांनी घेतलेल्या मुलाखतीच्या आधारे.]**



अनुक्रमणिका

# धुंद-फुंद करणारे 'गीत-गोपाल'

एप्रिल महिन्यात येथील स्वातंत्र्यवीर सावरकर स्मारकाच्या सांस्कृतिक समितीने एक अभिनव कार्यक्रम सादर केला : सुप्रसिद्ध संगीत-दिग्दर्शक सी. रामचंद्र यांच्या निदर्शनाखाली काही निवडक गायकगायिकांनी कविवर्य ग. दि. माडगूळकरांच्या 'गीत गोपाल'चे केलेले गायन.

माडगूळकरांच्या या नव्या गीतमालिकेत कृष्णजन्मापासून तो अक्रूराच्या रथात बसून कृष्ण कंसाघरी जातो त्या घटनेपर्यंत कृष्ण-चरित्रातील ठळक प्रसंग रंगविलेले आहेत. "शरच्चंद्रिका मूक हुंकार देते, वनीं राधिका गीतगोपाल गाते" अशा ओळींनी निवेदक या गीतमालिकेची सुरुवात करतो, आणि पुढील सारे प्रसंग राधेच्या आठवणींतून साकार झालेले आहेत अशी कल्पना कवीने केलेली आहे. अर्थात् राधेशिवाय प्रसंगवशः यशोदा, बलराम, कृष्ण आणि गोकुळातील गोपगोपी यांच्याशी तोंडी या गीतांची योजना केलेली आहे.

स्वतः सी. रामचंद्रच वर उद्‌धृत केलेल्या काव्यपंक्तींनी गायनाला सुरुवात् करतात. त्यांचा आवाज थरथरता, भावार्त आहे; रूढ अर्थाने घोटलेला नाही. उच्चारांमध्ये नजाकत आहे. त्यामुळे गीताचे मूळचे माधुर्य आणि त्यांतील भावनेचा हळूवारपणा ते पूर्णांशाने श्रोत्यांच्या मनावर बिंबवितात. आपल्या छत्राखालच्या तरुण गायकगायिकांकडून त्यांनी हीच कामगिरी बजावून घेतलेली आहे.

मी ऐकलेल्या कार्यक्रमात मन्ना डे व महेंद्र कपूर या गाजलेल्या चित्रपट गायकांचा, त्याचप्रमाणे प्रभाकर कारेकर या नव्या उमेदीच्या खानदानी गायकाचा, समावेश नव्हता. उरलेले गायक होते लक्ष्मी शंकर, प्रमिला दातार, बकुल पंडित, राजेश्वर बोबडे, अरुण सरनाईक आणि राणी वर्मा. लक्ष्मी शंकरांच्या आवाजाला एक आगळाच गोडवा आहे; त्यांच्या तोंडून राधेचे "अजन्मा जन्मासी आला, कारागारीं, अंधःकारीं कृष्णजन्म झाला" हे गीत ऐकताना त्यांच्या गायकीच्या अभिजातपणाची प्रचीती पटली. दाक्षिणात्य असूनही त्यांनी मोठ्या कसोशीने मराठी शब्दोच्चार आत्मसात् केलेले दिसले त्यांतही क्वचित् दाक्षिणात्य झांक दिसलीच तर त्यामुळे त्या उच्चारांचा गोडवा वाढायचा !

राजेश्वर बोबडे हे एक राजस आवाजाचे तरुण गायक आहेत. "निजवंशदीपका धरून शिरीं । वसुदेव निघाले नंदघरीं" हे गीत ते मोठ्या आत्मविश्वासाने गायले. सी. रामचंद्रांनी एका पहिल्या प्रतीच्या गीतगायकाची मराठी जनतेला ओळख करून दिलेली आहे. त्यानंतरचे सौ. प्रमिला दातार यांचे "निराधार मी भीरू भगिनी" हे देवकीच्या तोंडचे गीतही तितकेच रंगले. याला सी. रामचंद्रांनी बिहागाची छटा असलेली एक अत्यंत परिणामकारक चाल दिलेली आहे. आधुनिक केशभूषा, रेखीव चेहरा आणि अभिरुचीयुक्त वेशभूषा यांच्यामुळे मुळातच व्यक्तित्वसंपन्न आवाज लाभलेल्या




-- ज्ञानेश्वर नाडकर्णी

प्रमिलाबाईंनी श्रोत्यांवर चांगली छाप पाडली. (त्यांचे हे गीत दुसऱ्यांदा मी ऐकले तेव्हाही ते एका न रंगलेल्या कार्यक्रमात विशेष आठवणीत राहून गेले.)

माडगूळकरांची काही गीते मूळ कृष्णचरित्राला पोषक अशा स्वतःच्या कल्पनेतील प्रसंगांवर आधारलेली आहेत. त्यांनी 'गीत गोपाल'ची शोभा जास्तच वाढविली आहे. उदा. बोबड्या बलरामाचे "दूद नको पाज्यू हलीला काल्या कपिलेचें । काला या मनती आई ग, पोल गुलाक्याचें" हे गाणे. सी. रामचंद्रांनी याला एक चटपटीत, हलकीफुलकी चाल दिलेली आहे. हे गीत गायले सौ. माणिक वर्मा यांची १०–१२ वर्षांची मुलगी राणी हिने. हिचा आवाज अतिशय गोड आहे, आणि तिची तालासुराची जाण पक्की आहे. सी. रामचंद्रांनी ओळख करून दिलेली ही आणखी एक नवी गायिका. हिची वडील बहीण भारती ('धन्य ते गायनी कळा'मध्ये प्रसिद्धीला आलेली) हिच्याप्रमाणे हिचेही भवितव्य उज्ज्वल आहे याची साक्ष तिच्या गायनात मिळाली. "सांगती खोटें त्या गौळणी" हे बाळकृष्णाचे गीतसुद्धा राणीने उत्तम म्हटले.

कालियामर्दनाचे वर्णन करणारे "सर्पफणीवर कृष्ण नाचला यमुनेच्या डोहीं" हे गीत समस्त गायकवृंदाने गायले. अरुण सरनाईक हे यातील एक प्रमुख गायक. या गुणी नटाचा आवाज भरदार आणि सुरेल आहे. 'लवंगी मिरची कोल्हापूरची' या नाटकात त्यांच्या गानकौशल्याची ओळख झालेली होती. अलीकडे त्यांनी काही चित्रपटांसाठीही गाणी म्हटलेली आहेत. 'गीतगोपाल'मध्ये त्यांनी मर्यादित अवधीत चांगला रंग भरला.

याहीपेक्षा जास्त रंगतदार समूह गीत म्हणजे गोपकिशोरींचे "परत दे, वस्त्रें गोपाळा ! नीर नेसलों, नभ पांघरलों, आम्ही व्रजबाळा" हे. हे अर्थातच फक्त गायिकांनी म्हटले, आणि "ठेऊन तडाकीं काचोळ्या नेसगीं । निःशंक डुंबतों आम्ही साऱ्याजणी" या ओळी म्हणताना त्यांनी आपल्या चेहऱ्यावरील तटस्थ भाव कायम ठेवला ! "प्रलयघन दाटले चहुदिशी अंबरीं" हे आणखी एक समूह गीत राजेश्वर बोबडे यांच्या खड्या आवाजामुळे स्मरणीय ठरले.

या सबंध कार्यक्रमाचा उच्चांक बिंदू म्हणजे बकुल पंडित हिने गायलेले "शरदामधल्या संध्याकाळीं । शांती नांदे उभ्या गोकुळीं । निळ्या नभाच्या भाळावरती, पूर्ण चंद्र साजतो, । पावा वनिं








वाजतो" हे गीत. याच्या साध्या सुंदर चालीला "पावा वनि वाजतो" या ओळीच्या शैलीदार पुनरुक्तीमुळे अशी काही बहार आलेली आहे! आणि निरागस, मुग्ध चेहऱ्याच्या बकुल पंडितचा आवाजही आहे अतिशय प्रभावी! पुण्याच्या बालगंधर्व रंगमंदिराच्या पु. ल. देशपांडे-आयोजित उद्घाटन सोहळ्याच्या वेळी गतवर्षी मी तिने गायलेले माडगूळकरांचेच दोन गंधर्व स्तुतिपर श्लोक ऐकले होते. आवाज स्मरणात होता, परंतु त्या आवाजात इतके मन मोहरून टाकणारे गायन ऐकायला मिळेल अशी कल्पना नव्हती. "पावा वनि वाजतो" ही तिची ओळ तर श्रोत्यांनी उचलून धरलीच, पण सबंध गाण्यालाही 'वन्स मोअर' दिला.

कार्यक्रमातले शेवटचे समूहगीत म्हणजे रासक्रीडेचे वर्णन करणारे "शिवप्रभेसम पडे चांदणें यमुनापुलिनावरी । गोपीसंगे खेळ खेळतो लीलानट श्रीहरी" हे ! (किती सुंदर ओळी आहेत या ! प्रसाद हे माडगूळकरांच्या काव्याचे व्यवच्छेदक लक्षण आहे ! ) सी. रामचंद्रांनी या गीतासाठी त्याला साजेसा गुर्जर समूह-नृत्याचा ठेका वापरलेला आहे. त्यांच्या वाद्यवृंदात तबला, डफ, पखवाज, इ० चर्मवाद्ये सारख्याच सफाईनं हाताळणाऱ्या अण्णा जोशींनी या गाण्यासाठी ढोलक मोठ्या तडफेने वाजविला.

यानंतर नारदाच्या तोंडचे "विजय असो तव सदैव कंसा" हे गीत सी. रामचंद्रांनी म्हटले. त्यांच्या मृदु आवाजातील "श्री नारायण, जय नारायण । नारायण नारायण" हा घोष अजून कानांत रेंगाळतो आहे. "शरच्चंद्रिका मूक हुंकार देते" या गीताच्या गायनाने त्यांनीच 'गीत गोपाल' ची समाप्ती केली. एका विलक्षण धुंदीत तरंगत तरंगत आम्ही प्रेक्षागृहाबाहेर पडलो.

## तीन बंगाली नाटके

जानेवारी महिन्यात राज्य नाटचस्पर्धेच्या अंतिम फेरीतील नाटके पाहण्यात गुंतल्यामुळे 'नंदीकार' या कलकत्त्याच्या नाटच-संस्थेने सादर केलेली बंगाली नाटके मला पाहता आली नाहीत; परंतु गेल्या महिन्यात येथे आलेल्या 'चतुरंग' या कलकत्त्याच्याच हौशी नाटचसंचाने केलेले तीनही नाटचप्रयोग मी पाहिले.

पहिले नाटक होते सलील सेन यांचे 'डाउन ट्रेन' हे. राज्य नाटचस्पर्धेत याच नाटकाचा बडोद्याचे प्रा. यशवंत केळकर यानी केलेला अनुवाद प्रयोगरूपाने पाहायची संधी लाभली होती. त्यामुळे या नाटकाच्या बाबतीत भाषेची अडचण तितकीशी जाणवली नाही. बंगालमधल्या एका आडवाटेवरील छोटचाशा रेल्वे स्टेशनाच्या आवारात या नाटकातील सर्व घटना घडतात. स्टेशनमास्तर सत्य-भूषण हे नाटकातले मध्यवर्ती पात्र. अत्यंत सदाचरणी असा हा माणूस केवळ आपल्या अत्यवस्थ बायकोचे प्राण वाचविता यावेत या हेतूने दुसऱ्याने ठेवावयास दिलेल्या पैशांचा अपहार करतो आणि त्या प्रयत्नात चुकून आपल्या स्वतःच्याच तरुण मुलाच्या खुनास कारणीभूत होतो !

'डाउन ट्रेन'च्या कथानकाचा गाभा हा असा 'मेलोड्रॅमॅटिक' आहे. त्यात कर्मधर्मसंयोगाला व अतिरिक्त घटनांना वाजवीपेक्षा जास्त वाव आहे. 'चतुरंग'च्या प्रयोगाचे नेपथ्य (स्टेशनमास्तरचे) ऑफिस व पिछाडीचा भाग) बडोद्याच्या प्रयोगाच्या तुलनेने फारसे कल्पकतापूर्ण नव्हते. आगगाडी स्टेशनात येते व स्टेशनातून जाते हा तपशील बडोद्याच्या मंडळीने जास्त प्रभावीपणे प्रकाशयोजनेद्वारे दाखविला होता. 'चतुरंग'ची प्रकाशयोजना सुप्रसिद्ध प्रकाशयोजना-तज्ज्ञ तापस सेन यांची असूनही ती विशेष डोळचात भरण्याजोगी नव्हती. स्टेशनमास्तराचा पांढरा कोट नुकताच 'गारमेंट'मधून आणल्यागत लख्ख धुतलेला होता. प्रयोगातील समूह योजनाही (उदा. अखेरच्या प्रसंगात दोन पोलीस इन्स्पेक्टर येरझारा घालतात त्या वेळच्या) फारशा समाधानकारक नव्हत्या.

एवढे सारे दोष असूनही प्रयोग उठावदार झाला याचे कारण बहुतेक सर्व नटांचा वास्तववादी अभिनय. विशेषतः दिग्दर्शक बारुन दासगुप्ता यांनी केलेल्या स्टेशन मास्तरच्या भूमिकेतील त्यांचा मुद्राभिनय, दुसऱ्या अंकात त्यांच्या चेहऱ्यावर दिसणारी आपल्या भीषण कर्माची जाणीव, खून आपल्या मुलाचाच झाला आहे हे कळताच त्यांनी फोडलेली किंकाळी आणि अखेर आपल्या पत्नीच्या मृत्यूची वार्ता कळताच त्यांनी केलेला शोक हे सर्व दीर्घकाल रसिकांच्या स्मरणात राहील.

दुसरे नाटक 'आवर्त' हे समरेश बोस यांच्या कादंबरीवरून स्वतः बारुन दासगुप्ता यानीच लिहिलेले. यात एका बंगाली खेडचातील जोतेदारांच्या पिळवणुकीला तोंड देणाऱ्या दोन शेतकरी भावांची हृदयस्पर्शी कहाणी सांगितलेली आहे. यांच्यापैकी एक भाऊ आपल्या परिस्थितीला कंटाळून शहरात जातो, पण तेथेही त्याचे जेव्हा निभत नाही तेव्हा तो पुन्हा आपल्या खेडचात परततो आणि जोतेदारांविरुद्ध उभ्या राहिलेल्या शेतकऱ्यांच्या लढचात सामील होतो.

यात बारुनदांनी ज्या पात्राची भूमिका स्वीकारली ते प्रेक्षक आणि इतर पात्रे यांच्यामध्ये एक दुवा निर्माण करणारे, पाश्चात्य नाटकातील 'कोरस'च्या जातीचे पात्र होते. शेतकऱ्यांची रांगची रांग नाटचगृहातल्या काळोखातून निळचा प्रकाश-शलाकेच्या मंद उजेडात रंगमंचापर्यंत चालत येते आणि पायऱ्या चढून वर येते; त्याचप्रमाणे मध्यन्तराच्या वेळी पडदा न पडता नाटचगृहा-तील दिवे लागतात आणि रंगमचावरील पात्रांच्या स्वाभाविक हालचाली तशाच चालू राहतात—हे दाखवून लेखक-दिग्दर्शकाने प्रेक्षक आणि नट यांच्यातील तादात्म्य जास्तच पक्के करण्याचा प्रयत्न केलेला होता. यातील पहिला भाग जरी वास्तव वाटला तरी दुसऱ्याचा अंतर्भाव प्रयोगात करताना नाटचमाध्यमाची स्वभाव-विशिष्ट कृत्रिमता आणि आभासात्मक शैली यांचा विचार केला गेला नव्हता असे वाटले. मला तरी मध्यन्तराच्या वेळी रंगमंचा-वरील नटांना तसेच ताटकळत ठेवून चहासाठी उठून जाणे हे मोठे चमत्कारिक वाटले ! (प्रेक्षकांमधून नटांनी वाट काढीत रंगमंचावर प्रवेश करणे या तंत्रातही आता काही नावीन्य राहिलेले नाही.

(पान ६३ वर पहा)











## साठ वर्षांचे सुरेल व्यक्तित्व
# जी. एन्. जोशी

"जी. एन्. जोशी" ह्याना मी एक सुरेल व्यक्तित्व असे म्हटले आहे. ते साठ वर्षांचे झाले असले तरीही त्यांना 'प्रसन्न' व्यक्तित्व लाभले आहे. 'संपन्न' व्यक्तित्व लाभले आहे पण मला त्यां प्रसन्न वा संपन्न व्यक्तित्वापेक्षाही त्यांच्यातल्या 'सुरेल' व्यक्तित्वाचे प्रथम-पासून आकर्षण वाटत आले आहे. त्यांच्यातल्या 'सुरेल' व्यक्तित्वाचा आणि माझा प्रथम परिचय झाला आणि नंतर त्यांचा प्रत्यक्ष परिचय झाला. त्या परिचयानंतरही ते सुरेल व्यक्तित्वाचे दर्शन कुठेही विघडले नाही. कायमच राहिले. आज जी. एन्. साठ वर्षांचे झाले असले तरीही त्यांचे व्यक्तित्व 'अजून' राहिले आहे त्याचेही कारण त्यांच्या 'सुरेल' व्यक्तित्वात आहे असे मला वाटते. काही काही माणसे नुसती बोलत नाहीत. त्यांचे बोलणे हेच मुळी एखादे गीत असते, सुरेल सुरावट असते, भावगीत असते, एखादा अनवट राग असतो. जी. एन्. जोशी यांना गेली वीस वर्षे मी पाहतो–ओळखतो. त्यांचे उमदे व्यक्तित्व कधी कोमेजलेले मी पाहिले नाही. ही किमया मला वाटते कला करू शकते. कलावंत कधी म्हातारा, जून होत नाही. त्याची कला आनंदाचे ताटवे फुलवीतच राहते. कलेच्या सहवासात माणसे चिरनवच राहतात. जी. एन्. जोशी हे तर हाडाचे कलावंत आहेत. म्हणूनच कायद्याची पदवी मिळविणारा हा कलाकार 'यस् मिलॉर्ड' म्हणत व काळा डगला चढवून खऱ्याचे खोटे वा खोटचाचे खरे करण्याच्या किमयेत रममाण होण्याऐवजी खऱ्या-खुऱ्या, आनंददायी सुरात रमला आणि सुरातच बुडून गेला. जी. एन्. जोशी हे संगीताशी जडलेले नाते सांभाळणारे, निष्ठेने वाढविणारे गायक कलाकार आहेत. किंबहुना कळत्या वयापासून गाणे–सूर–भाव–भावगीत ह्याच गोष्टींशी त्यांनी इमान राखले आहे. वडील वकील–आणि परंपरा मानण्याचा व सांभाळण्याचा तो काळ! लौकिक अर्थाने 'एल्. एल्. बी' ही पदवी संपादन करून नाममात्र का होईना 'जी. एन्.'नी ती परंपरा सांभाळली. पण स्वतःच्या श्रद्धा–परिश्रम–कल्पकतेने एका नव्या परंपरेला मात्र त्यांनी जन्म दिला. ती परंपरा आहे भावगीतांची! ते स्वतः उत्तम व जाणकार गायक असल्याने व शास्त्रीय संगीताची परंपरा असल्याने त्यांनी अनेक कवींच्या कवितांना सुंदर स्वर-साज चढविला आहे.

आज भावगीत हे घरोघरी पोहचले आहे. परंतु पंचवीस तीस वर्षांपूर्वी त्यात अपूर्वाई होती. धाडसही होते. खानदानी दर्जेदार संगीत व त्या संगीताचा श्रेष्ठ वारसा लाभलेले नाट्य संगीत ह्यांच्या 'चालू' जमान्याचा तो काळ. अशा काळात जे 'शास्त्रीय' नाही ते सहज खपेल अशी स्थिती नव्हती. कविता म्हटल्या जात. पण त्यांचा गायकीशी दूरान्वयानेच संबंध (असला तर) असे. त्यामुळे जी. एन्. जोशी ह्यांनी त्या काळच्या लोकप्रिय अशा माधव ज्युलियन, तांबे, अनिल, यशवंत, गिरीश, ना. घ. देशपांडे आदि अनेक कवींच्या कवितांना जेव्हा स्वर-ताल-लयींनी बांधलेल्या अशा आकर्षक चालींचा साज




चढवायला सुरुवात केली तेव्हा इये प्रांती कुणीतरी नवा पुरुषावतार जन्म पावला असे याची जाण साऱ्या गानरसिकांना आली. 'जी. एन्. जोशी' हे नाव रानारानातच नव्हे तर घराघरात शीळ घालीत गेले. तांब्यांची 'डोळे हे जुलिम गडे' माधव ज्युलियनांची 'संगमोत्सुक डोह' ना. घ. देशपांडयांची शीळ, अनिलांची 'दो दिवसांचे दो प्रहरांचे प्रेम जरी सखये असते, आकाशीच्या अंतराळी तारकांना तेज चढे, तुझी माझी प्रीति जडे अशा अनेक भावगीतांना जोशांनी भावनोचित स्वरसाज चढवला आहे. आज त्यांच्या सत्तर पंचाहत्तर ध्वनिमुद्रिका आहेत. परंतु त्यांच्या संख्येपेक्षाही त्यांनी ह्या काव्य प्रकाराला लोकप्रियता प्राप्त करून देण्यासाठी प्रारंभकाली व 'हिज मास्टर्स व्हॉईस' मध्ये १९३२ साली पदार्पण केल्यानंतर केलेल्या परिश्रमांना व कल्पकतापूर्ण प्रयत्नांना तुलना नाही असे म्हणता येईल. खामगावचे जोशी नागपूरला गेले. अनिल-ना. घं. ची मैत्री त्यांना लाभली. पण मुंबईला त्यांचे सारे 'सांगीतिक' व्यक्तित्व घडले ही गोष्ट त्यांनाही मान्य होण्यासारखी आहे. गाणे शिकणाराने खूप गाणे ऐकलेही पाहिजे. रियाझ केला पाहिजे. जोशांनी मुंबईत हे केले. आणि 'एच्. एम्. व्ही.'-च्या तबकड्यांच्या द्वारे सुरेख, सुरेल भावगीतांचा साज त्यांनी मराठी सारस्वताला चढविला. भावगीत घराघरातून पोहचविण्याची कामगिरी त्यांनीच प्रामुख्याने केली. त्या कल्पनेचे जनकत्व त्यांजकडे जाते. इतके सारे करूनही गोविंदरावांच्या व्यक्तित्वातले 'लाजाळूचे झाड' तसेच राहिले आहे. शालीन, सुकोमल, निरहंकारी वृत्ती अजूनही कायम आहे. हे सारे 'केले' म्हणण्यापेक्षा 'घडले' म्हणण्यात ते अजून धन्यता मानतात. अजूनही बरेच करायचे राहून गेले आहे. ही भावना





अनुक्रमणिका

त्यांच्या मनात कायम आहे. संगीताचा व्यासंग चालू आहे. इंग्रजी भाषेत, भारतीय शास्त्रीय संगीताचा परिचय करून देणारे पुस्तक त्यांनी लिहिले असून त्यात प्रत्येक रागाचे नोटेशन देणारी कागदी ध्वनिमुद्रिका देण्याचा प्रयत्न चालू आहे. भारतात ती सोय अजून उपलब्ध नाही, पण जोशांचा प्रयत्न चालू आहे. आठवणींचे पुस्तकही (स्वरगंगेच्या तीरी) प्रकाशनाच्या मार्गावर आहे. टपोऱ्या डोळ्यांचे, हसतमुख, उमदे, देखणे, प्रसन्न व सुरेल व्यक्तित्व धारण करणारे जोशी साठ वर्षांचे झाले ह्यावर मुळी विश्वासच बसत नाही. 'अजून यौवनात मी' ही वृत्ती हीच जोशांच्या कलेची कमाई व तुम्हा आम्हाला दिलासा देणारे आश्वासन ! गोविंदराव, सुरेल आवाजात भावगीत गा! कारण महाराष्ट्राचे तुम्ही खरोखरच भाव-गीत-गोविंद आहात ! अभिनंदन !

## नुसते 'नाव' नाही, निष्ठा !!

माणूस जन्मला की त्याचे बारसे होते. आणि आयुष्यभर ते 'नाव' त्याला चिकटते. पण नुसते नाव दिल्याने 'व्यक्तित्व' गवसतेच असे नाही. त्या व्यक्तित्वाच्या शोधात, त्या नावाला अर्थ प्राप्त करून देण्यात, त्या नावाला महत्तमत्व देण्यात मग माणसांची उभी हयात खपते. काही नावे मग नुसती नावे रहात नाहीत. त्यांचा बनतो इतिहास. प्रेरक, स्फूर्तिदायक ! कलेच्या, क्रीडेच्या, समाजाच्या आणि राजकारणाच्या क्षेत्रात ती नावे मग 'परवलीचे शब्द' बनतात. ती नावे उच्चारली की एक नटलेले व्यक्तित्व समोर उभे राहते.

मराठी चित्रपटाच्या क्षेत्रात असे व्यक्तित्व समोर उभे राहते ते **भालजी पेंढारकर** यांच्या रूपाने. वस्तुतः भालजी पेंढारकर हेही एक नावच. आणि तरीही नुसते नाव नाही. त्याहून खूप काही तरी– मोठे, उदात्त आणि सखोल ! व्यवसाय तर साऱ्याच माणसांना करावे लागतात. पण त्या व्यवसायाला जेव्हा काही श्रद्धा-निष्ठा लाभतात तेव्हा तो व्यवसाय उजळून निघतो. मग कुठलाही व्यवसाय सामान्य रहात नाही. कुठलीही 'निर्मिती' मग उगीचच जन्म घेत नाही. भालजी पेंढारकर ह्या नावाने मराठी चित्रपटाच्या क्षेत्रात जे काही साधले आहे आणि जे सामान्य नाही ते नेमके हेच आहे. निर्मितीसाठी निर्मिती–पोटासाठी (च) निर्मिती, धन-कीर्तीसाठी निर्मिती असे भालजींबाबत कधी घडलेच नाही. आजचा काळ हा 'स्पेशलायझेशन'चा काळ आहे. भालजींचा काळ प्रथमपासूनच स्पेशलायझेशनचा आहे. भालजींनी काही निष्ठा निश्चित केल्या ( वा भोवतालचे वातावरण, संस्कार, वाचन, अभ्यास. स्वातंत्र्यपूर्व कालातले आव्हानात्मक वातावरण, इतिहासाच्या अवशेषातून बोलक्या झालेल्या कथा आणि व्यथा यातूनही त्या निश्चित झाल्या असतील) आणि त्या त्यांनी जीवितभर जपल्या. प्रसंगी फार जबर किंमत देऊन जपल्या. मन खंबीर राखून निष्ठांवरची पकड कायम राखून त्यांनी मनगट पिचू दिले नाही. उरातील उमंग तरुणाच्या तडफेने आजवर जपली, म्हणूनच भालजी वयाने सत्तरीचे झाले तरीही 'भालजी' हे अजूनही परवलीचे नाव आहे. त्या नावापाठच्या निष्ठा अजूनही नव्या पिढीला प्रेरणा देऊन जाऊ शकतात. देव मानणाऱ्या वा न मानणारांचीही काही दैवते निश्चित होत असतात. अनेक कारणे असतात त्याला. भालजींची अशी काही दैवते बनली आहेत. त्यामागच्या साऱ्या प्रेरणा मात्र एक आहेत. ह्या "देशाच्या माती"त त्या एकवटल्या आहेत. ह्या देशाचा धर्म, संस्कृति, इतिहास, परंपरा, श्रद्धास्थाने, दैवते, मूल्ये आणि त्या साऱ्या गोष्टींसाठी घडलेले मानवी दैवतांचे प्रवास ह्या साऱ्या गोष्टीत भालजींच्या निष्ठा सामावलेल्या आहेत. 'शंभर टक्के' भारतीय असे भालजींचे वर्णन थोडक्यात करता येईल. भालजींचे हे भारतीयत्व केवळ इतिहासात रमणारे नाही. सामाजिकातही त्याला रस आहे. ते सामाजिक खेड्यातही गवसेल, क्वचित शहरातही ! 'मूल्ये' मानून, त्यांच्या जयजयकारासाठी, त्यांचे मोठेपण रुजविण्याच्या प्रतिज्ञेने भालजींनी कला राबविली आणि तरीही कलावंत म्हणून त्यांनी आपली 'शान' कायम राखली. कलेचा ध्वज डागळू दिला नाही. महात्मा गांधींच्या वधानंतर झालेल्या दंगलीत सारी पूर्व तपश्चर्या जळून भस्मसात् झाली. उघड्या डोळ्यांनी हे ज्वलन त्यांनी पाहिले. पण ह्या मातीचे तत्वज्ञान पचविलेला हा माणूस होता म्हणून त्याने ते विषही पचविले आणि 'अमृत सिद्धना'चे कलेचे व कलावंताचे खरेखुरे कार्य त्याने निष्ठेने पुढेही चालविले. समस्या वापरल्या पण 'प्रचारकी' होऊ दिल्या नाहीत. इतिहासाचा वापर त्यांनी केला. पण डोळस वापर केला. मानचित्रे कधी डागळू दिली नाहीत. विडंबने होऊ दिली नाहीत. त्या त्या व्यक्तींच्या कथा, त्यांचे हर्षखेद प्रामाणिकपणे समोर मांडले. त्यांचा शिवाजी, संभाजी, नेताजी पालकर 'शान'दार वाटले. सारे ऐतिहासिक पुरुष 'सामाजिक' वाटले नाहीत. त्यामुळेच 'शिवाजी' लिहावा भालजींनीच असे सार्थ समीकरण सिद्ध झाले. आणि ग्रामीण जीवनातली सूक्ष्मताही टिपावी भालजींनीच हे 'मीठ भाकर' सूत्र आजवर टिकून आहे. भालजी हे केवळ ध्येयवादी चित्रपट निर्माते नाहीत. ते ध्येयनिष्ठ कार्यकर्ते आहेत. प्रभावी वक्ते आहेत. अभ्यासक आहेत. आणि अनेकांचे प्रेरणास्थान आहेत. आशास्थान आहेत. त्यांच्या सहवासात अनक लहान माणसे मोठी झाली. त्या व्यवसायात झाली, बाहेरही झाली. आणि ही सारी मोठी माणसे 'भालजी पेंढारकर' यांना मानतात. कारण भालजी हे नुसते नाव नाही–ती एक निष्ठा आहे असे मला वाटते. भालजी, विनायक व बाबूराव पेंढारकर ह्या त्रिवर्गबंधूंनी मराठी चित्रपटसृष्टीत केलेली कामगिरी निष्ठा म्हणूनच जपली जाईल असा मला विश्वास वाटतो.

## 'नॉट आऊट' नानासाहेब !!

कलेला जात नसते, तसंच वयही नसतं हेच खरं ! अन्यथा नटवर्य केशवराव दाते, नानासाहेब फाटक ही सत्तरीच्या पुढली माणसे तरुणाच्या तडफेने व कलाधुंदीने नाटकाच्या मंचावर वा प्रेक्षागारात सातत्याने दिसली नसती. तशी ती दिसतात ह्याचाच अर्थ वय वाढले तरी रंग जुना होत नाही. 'नाट्य' जुने होत नाही. तारुण्यातली वर्डे






अनुक्रमणिका

माणसांना सोडून जात नाहीत. ही वेडे पुढे वेडे राहिली नाहीत. त्या निष्ठा बनल्या. तो नुसता 'व्यवसाय' राहिला नाही.'व्यासंग' बनला. म्हणूनच ही माणसे अजूनही त्या व्यासंगात आहेत—व्यवसाय सुटला तरीही ! नटवर्य नानासाहेब फाटक हे नुसते नट नव्हते, नाहीत. जेव्हा केव्हा ही मंडळी नाटक कंपनीच्या बिऱ्हाडी जाऊन उभी ठाकली असतील तेव्हा केवळ तोंडाला रंग फासून अभिनयाचे माध्यमातून जनसाधारणाशी संवाद साधता यावा येवढीच मर्यादित कल्पना असेल; त्यावेळी ही "वाट चुकलेली पोरं"च मानली जात होती. परंतु पुढे ती तशी राहिली नाहीत कारण ही मंडळी नुसती 'नट' नाहीत. त्या क्षेत्रापुरती आवश्यक असलेली सर्व तपश्चर्या करण्याची ह्या माणसांची तयारी आहे हे सिद्ध झाले. त्यापुढे नटवर्य दाते काय, फाटक काय, मामा पेंडसे काय ही मंडळी नुसती नट राहिली नाहीत. फाटक हे त्या काळाच्या मानाने शिक्षित नट ! परंपरा चांगली. व्यासंगी ! त्यामुळे नानासाहेबांनी नुसती 'पढिक' पोपटाची भूमिका मनोमन मानली नाही. ते वाचत राहिले. अभ्यास करीत राहिले. एखाद्या भूमिकेच्या अभिव्यक्तीकरणाबाबतच्या (प्रेझेंटेशन) भिन्न भिन्न शक्यतांचा (पॉसिबिलिटीज्) ते विचार करीत राहिले. इंग्रजी वाङ्मयाचा—नाटकांचा व नाट्यविषयक ग्रंथांचा साक्षेपाने अभ्यास करीत राहिले. त्यातून त्यांचा हॅम्लेट घडत गेला. 'झुंजारराव'चे वेगळे रूप जनतेला दिसले. 'राजमुकुट'ला नवे व्यक्तित्व लाभले. 'वैजयंती'तला यशपाल काही नवा ठसा उमटवून गेला. त्यांचा वृंदावन आणि कमलाकर 'परंपरागत' वाटला नाही. सुधाकराचेही काम ते करतात. पण त्यात 'बोडस' टच् नसतो. (अगदी पोपाखात सुद्धा नसतो) बेबंदशाहीतला संभाजी तर उभा करावा नानासाहेबांनीच ! "ललित कले"तल्या या कारकीर्दीत कुसुमाकर—केरोपंत त्यांनी लोकप्रिय करून दाखविला. 'सोन्याचा कळस'मधील 'बाबा शिगवण'ची भूमिकाही अशीच व्यक्तित्वसंपन्न होती. नानासाहेब फाटक हे जन्मजात (बॉर्न) नट आहेत. रुबाबदार व्यक्तित्व, फिरता चेहरा, बोलके डोळे आणि पहाडी-खणखणित-कलदार आवाज. भूमिकेची समज-अभ्यास आणि प्रत्येक भूमिकेला स्वतंत्र व स्वतःचे व्यक्तित्व देण्याचा प्रयत्न यामुळे नानासाहेब फाटक हे नाव जुने झाले नाही. 'भाऊबंदकी'तील राघोबा ही अशीच त्यांची एक संपन्न भूमिका. त्यानंतर अनेकांनी ती सादर करण्याचा प्रयत्न केला, परंतु अजूनही नानांच्या राघोबाची प्रतिमा मनापुढून नाहीशी करणे कुणालाच जमले नाही. हे त्यांचे यश स्वयंसिद्ध व तपःसिद्ध आहे असे मी मानतो.

"नट" ह्या भूमिकेशी ते प्रामाणिक राहिले हे मला त्यांचे आणखी एक वैशिष्ट्य वाटते. नानासाहेबांच्या बरोबरच्या मंडळीपैकी व नंतरच्या पिढ्यांपैकी अनेक माणसे दिग्दर्शक बनली. 'निर्माता' बनली. आणखीही बरीचशी रूपांतरे त्यांच्या बाबतीत झाली. पण नानासाहेब फाटकांनी 'नट' ही भूमिका सोडली नाही. कदाचित व्यवहारी सावधपणा हेही त्याचे कारण असू शकेल. पण पडत्या काळातही नानासाहेब नाइटस् मिळवीतच होते. त्यांचे वैयक्तिक व कौटुंबिक जीवन त्यांनी नीटनेटकेपणान आत्र राखून काढले. आणि आपल्या भूमिकांचे ठसे मराठी नाट्य रसिक माणसावर उमटविले. कलावंत हा काहीसा लहरी असतो आणि नटावर वा कलाकारावर प्रेम करणारी माणसे त्याचे हे लहरीपण पोटात घालूनच त्याच्या कलेचा जयजयकार करताना दिसतात. नानासाहेबांच्या कलासाधनेत क्वचित असे 'लहरी क्षण' येऊनही गेले आहेत. पण त्यामुळे नानांची कला-प्रतिमा डागळली असे मला वाटत नाही.नाना गोष्टीवेल्हाळ आहेत. चर्चा त्याना आवडतात. ह्या वयातही 'नाट्य' हाच त्यांचा चर्चेचा व श्रद्धेचा विषय आहे. सत्तरीतही ते तसे 'ताठ' कण्याचे राहिले आहेत. 'स्वतंत्र' राहिले आहेत. कलेवरच्या निष्ठा वर्षानुवर्षे जपणारी जी काही थोर मराठी माणसे आज कलेच्या विविध क्षेत्रात वावरताना दिसतात, त्यात नानासाहेब फाटकांचे नाव घ्यावेच लागेल. स्वतःच्या भूमिकांचे विशदीकरण करण्यासाठी लिहिलेले 'मुखवट्यांचे जग' हे पुस्तक त्यांच्या अभ्यास—मनन—चिंतनाचे फलित होय !! अलिकडेच केशवराव दाते 'आपल्या आठवणी' लिहू लागले आहेत. नानासाहेबांनी आता आत्मचरित्रात्मक आठवणी लिहाव्यात म्हणजे गणपतराव जोशी यांच्या नंतरच्या एका प्रमुख गद्य-नटाच्या त्या आत्मचरित्रातून तत्कालीन (व आजच्याही) गद्य रंगभूमीची एक सुसूत्र व सुबक प्रतिमा त्यातून उभी राहू शकेल.

'सत्तरी' पार करूनही 'जरे'ला जराही जवळपास फिरकून देणाऱ्या ह्या 'कलदार' कलावंताला अभिष्ट चिंतितो !!

—आदित्य

---

(पान ६० वरून—इंद्रधनुष्य)

शेतकरी भावांच्या भूमिका मिहीर चतर्जी आणि ताराशंकर बानर्जी यांनी अस्सल ढंगात रंगविल्या.

'चतुरंग'ने सादर केलेले तिसरे नाटक 'बाबू' हे १८५३ साली जन्मलेल्या अमृतलाल बोस यांनी लिहिलेले. त्यात गेल्या शतकाच्या उत्तरार्धात आंग्ल भाषीय शिक्षण घेऊन अर्ध्या हळकुंडाने पिवळ्या झालेल्या तथाकथित सुधारकांची प्रच्छन्न टिंगल केलेली आहे. बंगालमध्ये हे सुशिक्षित लोक 'बाबू' या नावाने ओळखले जात. हे नाटक विनोदी असले तरी बंगालीच्या अज्ञानामुळे त्यातील फार्सिकल भागच तेवढा समजला. नाटकात तत्कालीन ब्राम्हसमाजीय विचारवंतांचाही उपहास केलेला आहे हे रामेन रॉय व सुजन सेनगुप्ता यानी रंगविलेल्या दाढीदिक्षीतांवरून कळून येण्याजोगे होते.

या मुक्कामात 'चतुरंग'च्या कलावंतांचा मुंबई मराठी साहित्यसंघाने सत्कार केला. त्याचा सुदीर्घ वृत्तान्त श्री. दि. वि. आमोणकरांच्या छायाचित्रासकट येथील 'टाइम्स ऑफ इंडिया'मध्ये छापून आला ही एक मोठी क्रांतिकारक घटना आहे. मात्र याच 'टाइम्स'च्या बंगाली नाट्यसमीक्षकाने 'बाबू'चे समीक्षण न करण्याचा अशिष्टपणा दाखविला ! • • •



## नवे आव्हान

लोकशाही हा आपल्या स्वातंत्र्य संग्रामाचा व नंतरच्या सर्व हालचालींचा मूलाधार होता व आहे. लोकशाहीनिष्ठा जपत, त्या चौकटीच्या मर्यादेत आणि तिचाच जयजयकार करीत आम्ही ब्रिटिशांविरुद्ध आतून आणि बाहेरून लढे दिले. पण निष्ठा सोडल्या नाहीत. स्वराज्य मिळाल्यानंतर तर आम्ही 'लोकशाही' हा परवलीचा शब्द मानला. आणि आमची घटना त्या दृष्टीने तयार केली. त्या 'घटने'ला धर्म मानणाऱ्या आणि त्या धर्माचा आधार घेऊन व्यक्ति व समाजजीवन संपन्न करू इच्छिणाऱ्या, विविध मतमतांतराच्या व्यक्तींना व पक्षांना कार्य करण्याची सुवर्णसंधी उपलब्ध करून देण्यात आली. आज प्रांतोप्रांती, एकाहून अनेक मते असलेले विविध पक्ष आज कामे करताना दिसतात. साऱ्यांचीच सारी मते पटत नसली तरी ती बाळगण्याचा, त्यांचा प्रचार करण्याचा, जनकौल मागण्यांचा, आणि कौल अनुकूल पडला तर एखाद्या प्रांताचे राज्ययंत्र चालविण्याचा अधिकार आज आपण सारेच मान्य करीत आलो आहोत. पण घटनेने हा अधिकार दिला आहे तो ह्या देशाच्या नागरिकांना ! त्यांनी त्याचा लाभ घ्यावा, त्या मर्यादा मान्य करून, त्या मर्यादेत स्वतःचे वैयक्तिक व सामूहिक जीवन यशस्वी करण्याचा प्रयत्न करावा म्हणून ही चौकट घटनेने मान्य केली. स्वयं कर्तृत्वाच्या बळावर जात, पात, प्रांत, भाषा, जन्मसिद्ध मोठेपणा यावर मात करून एखाद्या सामान्यातल्या सामान्य माणसालासुद्धा त्या राज्ययंत्रणेत महत्पदाला पोहचण्याची संधि उपलब्ध करून दिली. विचार, उच्चार, आचार, उपासनादि स्वातंत्र्य बहाल केली. आणि ह्या संधीचा योग्य वापर करून जनतेने गल्या चार सार्वत्रिक निवडणुकीत आपले 'मत' व्यक्त केले आणि गांही एका पक्षाची वा व्यक्तीची अनिर्बंध सत्ता आम्ही मान्य करणार नाही, तशी बांधिलकी आपण मानत नाही असे सिद्ध केले आहे. काँग्रेसने स्वराज्याच्या चळवळीचे नेतृत्व केले. पंडितजी–पटेल–आझाद आदि मंडळींच्या नेतृत्वाने केले. परंतु लोकशाहीमध्ये 'मत' हा अंतिम शब्द ठरला आणि १९६७ साली ठिकठिकाणी विरोधी पक्षांची सत्ता रूढ होऊ शकली. ह्याचा अर्थच असा की, लोकशाहीची चौकट मान्य केल्यानंतर हे जय पराजय मान्यच करावे लागतात. जी क्रांति व्हायची असेल, जो राज्यशकट यायचा (वा बदलायचा) असेल तो अखेर मतपेटीच्या माध्यमातूनच व्हायचा ! आम्ही ह्या तत्वज्ञानावर, ह्या शासन पद्धतीवर नुसतीच श्रद्धा बाळगून आहोत असे नाही तर आम्ही प्रतिज्ञाबद्ध आहोत. त्या माध्यमातूनच कम्युनिस्टांना केरळ-पश्चिम बंगालमध्ये राज्यकर्ते पद मिळाले आणि ते लोकशाहीच्या माध्यमातून मिळाल्यामुळे लोकशाहीनिष्ठांना तो कौल मान्यच करावा लागला. त्या पक्षांचे तेथील राज्य ह्या देशाशी निष्ठा बाळगील आणि घटनेच्या चौकटीत जोवर ते काम करीत राहील तोवर महाराष्ट्र-म्हैसूर प्रमाणेच तेही शुद्ध लोकशाहीचे राज्य राहील. त्यांचे 'उत्तम' हे आम्ही उत्तम मानू आणि त्यांचे टीकार्ह हे टीकार्हच मानू ! लोकशाहीत 'चुका' करण्याचाही अधिकार गृहित धरलेला असतो. आणि नेहरूंना जर 'हिमालयीन' चुका करण्याचा अधिकार (निवडून आल्यामुळे) प्राप्त झाला होता असे मानले तर तो नंबुद्रीपाद–मुकर्जींना नाही असे निदान लोकशाहीत तरी म्हणता येणार नाही.

आणि तरीही वाद येतो. केव्हा ? जेव्हा ही चौकट मोडून टाकून बाह्य निष्ठांना 'संरक्षण' व 'संवर्धन' दिले जाऊ शकते तेव्हा ! ह्या देशावर ज्यांची निष्ठा नाही. ह्या देशाला काही इतिहास, परंपरा, संस्कृति आहे आणि तिने कधी काळी दिग्विजय केला होता; तिलाही स्वतःचे असे काही जीवन मूल्य आहे. काही श्रद्धा आहेत यावर ज्यांचा काही विश्वास नाही. ज्यांची दैवते अ-भारतीय आहेत आणि ज्यांचे क्रांतीचे मार्ग लोकशाहीनिष्ठ नाहीत, अशा व्यक्तींना वा गटांना जेव्हा लोकशाहीनिष्ठ राज्यांकडून संरक्षण मिळते तेव्हा वाद उत्पन्न होतो. प. बंगालमध्ये अशा क्रांति प्रयत्नाची नांदी मागे 'नक्षलबारी' येथे म्हटली गेली. ऋत्विज होते कनु सन्याल ! एका हातात शस्त्र आणि दुसऱ्या हातात माओचे तैलचित्र असा त्यांचा खाक्या होता. त्यावेळी तो प्रयत्न फसला. आणि कनु सन्याल अटकेत पडले. कायदेशीर राज्यात कायदा मानून राहणाऱ्या निरपराध नागरिकांना संरक्षण देणे हे त्या त्या शासनाचे कर्तव्य असते. ते मग श्रीमंत असोत वा गरीब असोत. शेतकरी असोत वा कामकरी असोत. प. बंगालमध्ये संयुक्त आघाडीचे मंत्रिमंडळ आल्यानंतर कनु सन्याल मुक्त झाले आणि मे-दिनी त्यांनी आपली शस्त्रे व चाल उघड उघड व्यक्त केली. कनु सन्याल ही एक व्यक्ति नाही. ते एक तत्वज्ञान आहे. ते तत्वज्ञान केवळ पश्चिम बंगालमध्येच कार्यरत नाही. ते आंध्र, केरळ, प. बंगाल, बिहार, उत्तर प्रदेश आदि प्रांतातूनही त्याचे लहान मोठे उद्रेक होत असतात. आणि आता तर ते अधिक धीटपणे बोलू लागले आहे. माओचे तीर्थ चौकात घेण्याइतपत ते धीट झाले आहे. निरापराध माणसांचे बळी घेण्याइतपत, हल्ले करण्याइतपत ते मोकाटही सुटलेले दिसते आहे. नक्षलबारी ही तर नांदी होती. आंध्रमध्ये गत वर्षी काही गीते म्हटली गेली व १ मेला बंगालमध्ये प्रकटपणे कनु सन्याल यांनी आपली शस्त्रे व आपले हेतु नव्या पक्षाची घोषणा करून जाहीर केले आहेत. लोकशाहीचे संरक्षण घेऊन लोकशाही निष्ठा व जीवन पद्धतीवर आघात करायला निघालेला हा पक्ष आहे. विश्व मानवाच्या गप्पा मारणारा हा पक्ष विरोधी मत धारण करू शकणाऱ्या

मानवाला जगात जगण्याचा अधिकारच नाही अशा आत्यंतिक मताचा हा पक्ष आहे. रशियन व चिनी 'पर्ज' साऱ्यांच्या परिचयाची आहे. कनुजींच्या मते भारतीय पर्ज सुरू झाला की, साऱ्या लोकशाही शक्ती त्यात वसतील. हे नवे आव्हान आम्ही डोळसपणे पाहिले पाहिजे. त्याची चाल ओळखली पाहिजे आणि भारतीय स्वातंत्र्य व लोकशाहीवर येणारे संकट सावधपणे, धीटपणे परतवून लावले पाहिजे. माणसाला देवत्वापर्यंत पोहण्याचा मार्ग उपलब्ध करून देणाऱ्या ह्या संस्कृतीने माणसाचे "सरकारी गुलाम" बनविणाऱ्या ह्या तत्वज्ञानाचा साक्षेपाने पराभव केला पाहिजे. हे संकट सामान्य मानण्याची "हिमालयन" चूक पुन्हा घडता कामा नये. इतिहासाचे हे आव्हान आम्ही स्वीकारलेच पाहिजे.

**— सारस्वत**

(पृष्ठ १० वरून–**बुवांचा मुलगा**)

नावाने पहिली अचमनं करा नि मग यवनांची नांव घ्या!"

मुलाची ही कडवी मतं ऐकून बुवांना धन्य धन्य वाटे. ते पणतीत तेल ओतीत,

"अरे ह्या झाल्या शतकांपूर्वीच्या गोष्टी. पण आमचे गुरुबंधु विष्णुबुवा पलुस्करसुद्धा केवढे तेजस्वी! माझा राजा सध्या मंडाल्याच्या तुरुंगात आहे असं खुद्द पंचम जॉर्ज बादशहाला ऐकवलं! कुठे पंचम जॉर्जाचे बिल्ले छातीला लावणारे नि कुठे पंचमजॉर्जला छातीठोक जवाब देणारे! धमणीत हिंदूंचं रक्त असावं लागतं महाराज!" आणि क्षणात सावध होवून म्हणत, "पण बाबलीबाये, विद्या कुणाकडूनही घ्यावी हं. मी अलाहाबादेच्या मुसलमान न्हाव्याकडून धृपदं मिळवलेली आहेत! हाताला लागेल तिथून विद्या घे. कारण अखेर तीच बया कल्याण करील."

बापाच्या तालमीत मुलगा तयार होत होता. स्वतंत्र प्रज्ञेचं गाणं गात होता. एकदा बैठकीत साथीदारानं विचारलं,

"शिवरामबुवा, पट्टी कोणती धरू?"

"लक्षात ठेव. शिवरामबुवा मरेपर्यंत काळी चारमध्येच गाणार!" मलाने ठणकावून उत्तर दिलं. दिलेला शब्द पाळला. काळी चारला कधी अंतराय दिला नाही.

आपल्या गवई मुलाला लोक बहुमानाने 'शिवरामबुवा' म्हणायला लागलेले ऐकून बुवांनी डोळे मिटले.

बापाची गादी मुलाने चालू केली. नमनालाच आकाशवाणीशी उदंड वाद घातला. म्हणाले, 'माझ्या वडीलांना मोजून शंभर देत होतात. मलाहि तेवढेच मोजा.' अधिकाऱ्यांनी समजूत काढली. तेव्हा म्हणाले, 'ठीक आहे. तुमच्या शब्दासाठी मी कमी रक्कम स्वीकारतो. पण मी माझ्या वडीलांपेक्षां काय कमी गातो त्याची मला खात्री तरी करून द्या!' अधिकारी चचापले. हे पोर सवाई निपजलं ह्याची त्यांची खातरजमा झाली. शेवटी एकजण दबक्या स्वरात म्हणाला, "सध्या आमचं बजेट कमी आहे." त्यावर दिलखुलास हंसत शिवरामबुवा उत्तरले, "मग माझं काहीच म्हणणं नाही. तुमचं बजेट वाढलं की मला कळवा. मी गाईन. पण ज्या गादीवर माझा बाप बसला त्याच गादीवर जर मी बसायचं असेल, तर बिदागी जेवढी त्यांना देत होतात तेवढीच मला द्यावी लागेल! पाव आणासुद्धा कमी घेणार नाही."

शिवरामबुवाची कीर्त सवाई-दिडीने वाढत गेली. सकाळी चारुकेशी, दुपारी सुवराई, रात्री चांदणीकेदार, असे वासनातले नामी नग बुवा उलगडून दाखवू लागले. सर्वस्वी स्वतंत्र ढंगाचे अस्ताई अंतरे बुवांच्या गळ्यातून स्त्रवूं लागले. वेश मात्र बावळाच राहिला. पूर्वीपेक्षा दोन अंगुळं मागे गेला. एकदा धारवाडला जलशाला गेले. अधिकारी म्हणाले, "बुवा, आज खास निमंत्रीतांसमोर गायचंय. इतर गवई बघा कसे झकपक आल्यायत! नि तुम्ही! किमानपक्षी दाढी तरी करायची, धुतलेला झब्बा तरी घालायचा! हे असं डाग पडलेलं खमीस बरं दिसतं का?"

ओठावाहेर ओघळणारा पानाचा लाल रस न निपटताच बुवा चक्कीत उत्तरले,

"ज्यांत आपल्याला काहीं कळत नाही, त्यात आपण बोलू नये. लोकं इतरांचे कपडे बघायला नि माझं घरंदाज गाणं ऐकायला आले आहेत! कळलं?"

तृप्त पसंतीचा टाळ्यांचा गजर झेलूनच बुवांनी तो जलसा सोडला. नाक्यावरच्या रेस्टारंटमध्ये लेमनच्या मोजून दहा बाटल्या फस्त केल्या. आणि अनवाणी पायाने डुलत डुलत स्टेशनवर बेळगाव गाडी पकडायला गेले.

बेळगावला पोहोचल्यावर कळलं गावात बडोद्याहून उस्ताद फैय्याझखां आले आहेत. तसेच निघाले. बायको म्हणाली, 'निदान न्हाहा तरी घेवून जा.' तर म्हणाले, मी अमृत पिऊन येतो!'

दिवाणखान्यात चांदीची पिकदाणी घेऊन फैय्याझखांसाहेब बसलेले होते. हातात जळती इजिप्शीयन सिगरेट होती. यजमान खांसाहेबांबरोबर बोलत होते. त्यांचं लक्ष नव्हतं. ते खर्ज लावीत होते. शिवरामबुवा तिथे आले. खासाहेबांचे पाय धरले आणि सरळ दंडवत घातला. खांसाहेब भानावर आले. आनंदून म्हणाले,

'बेटा शिवा, कैसे हो? आम्ही बडोद्यात ऐकलं कीं तू बापापेक्षा तुफान गातोस! खरं? अरे, तुझ्या बापाचं गाणं आम्ही कलकत्त्याला ऐकलंय. वास्तविक पाहाता आपली घराणी वेगळी. पण तुझ्या बापाला आपण मानलं! त्याची अडाण्यातली चीज म्हणजे समुद्र असायचा, समुद्र! वाहवा! आता तुझं गाणं ऐकव की आम्हाला."

स्फुरण चढलेल्या बुवांनी वडीलांची अडाण्यातली "ताब रहो" ही द्रुत लयीतली चीज म्हणून दाखवली. तानांचा समुद्र उभा केला. खांसाहेब म्हणाले,

"बेटा, आजपर्यंत आम्ही तुझ्या बापाला मानत आलो. आमचे शागिर्द यापुढे तुला मानायला लागतील! जिते रहो!

"नुसता आशीर्वाद नको. प्रसाद पाहिजे. खांसाहेबांनी आपल्या घराण्यातली एक– फक्त एक चीज जरी म्हणून दाखवली तरी आमच्या श्रुती धन्य होतील."








खांसाहेबांनी तंबोरा छेडला. मेघ रागाचे सूर त्यांच्या गळ्यातून पाझरू लागले. बुवांची तहानभूक हरपली. चीज़ संपल्यावर बुवांनीं धारवाडच्या जलशात मिळालेल्या शंभर रुपयांच्या नोटा फय्याजखांसाहेबांच्या हातात कोंबल्या !

स्वरसामर्थ्याचा अद्भुत साक्षात्कार झालेले बुवा मग अनवाणी पायाने डुलत डुलत घरी परतले. घरची लक्ष्मी फणकाऱ्यातच होती. म्हणाली, "सोन्यासारखे चालून आलेले शंभर रुपयेसुद्धा फुंकून बसलात नं? आता खाल काय.? माझी हाडं?"

"आपण दुकानातून उधारीने वस्तू आणूं" बुवा थंडपणे म्हणाले.

"पण मागची उधारीच इतकी थकल्याय कीं गुजर अता पची वस्तू देणार नाही."

"आपण दुकान बदलू. त्यात आहे काय नि नाही काय?"

बुवांच्या गृहलक्ष्मीने पराभव मान्य केला.

## 'कादंबरीके'साठी रौप्य–पदक

'दीपावली'च्या रौप्य–महोत्सवी वर्षात (मार्च १९६९ ते फेब्रुवारी १९७०) 'कादंबरिका' प्रसिद्ध करण्यात येणार आहेत. त्या एकाच अंकात प्रसिद्ध होणार नाहीत. त्यामुळे या कादंबरिकांपैकी सर्वोत्कृष्ट कादंबरिका कोणती या बाबत वाचकाचे मत वर्ष अखेरीला प्रसिद्ध होणाऱ्या खास 'कूपन'द्वारेच अजमाविण्यात येईल आणि वाचकांनी अग्रमान दिलेल्या 'कादंबरीके'च्या लेखकाला 'रौप्य–पदक' देण्यात येईल.

—संपादक

बुवांचा लौकिक पसरला. गाण्यातल्या बहादुरीचा, तसाच त्यांच्या अवलीयेगिरीचा. बुवांची अस्ताव्यस्त वागणूक, बेशिस्त आहार, आणि सर्वांच्या डोक्यावरून जाणारं गाणं ह्यामुळे त्यांना बैठकींची निमंत्रणं येईनातशी झाली. शिकवण्यांचा क्लास उघडून रुपये गोळा करणं त्यांच्या रक्तातच नव्हतं. पर्यायाने अन्नाच्या नावाने फांके मारण्याची वेळ आली. सर्व बाजारपेठेत उधारी झाली. मग बुवा परगावी चकरा मारू लागले. कोंडाकणी जमा करू लागले. जमलेली फस्त करू लागले.

एकदा बुवा पुण्याला चार दिवसांसाठी आले होते. नेमक्या त्याच वेळी एक बडे मुसलमान गवई बेळगांवला जाऊन जलशाचे पांचशे रुपये रोखी मिळवून गेले. बुवा बेळगावला परतल्यावर ही बातमी त्यांना कळली. त्यासरशी ते म्युझिक सर्कलच्या चिटणीसाच्या घरी गेले. म्हणाले,

"हा काय चावटपणा आहे ? त्या फलाण्या फलाण्याला तुम्ही पांचशे रुपये दिलेत ?"

"दिले."

"कां ? खपत नव्हते ?"

"खांसाहेब उत्तम गवई आहेत आणि उत्तम गाऊन गेले. अशांना घसघशीत बिदागीच दिली पाहिजे."

'मी तितका, किंवहुना त्याच्यापेक्षा उत्तम गायलो, तर मला द्याल तेवढी बिदागी ?"

चिटणीस ढेपाळला. बुवांनी विचारलं,

"कुठले राग गायला तो पांचशे रुपयेवाला बडा गवैय्या ?"

"शुद्धकल्याण, मालकंस, सुरदासी मल्हार —"

"ठिक आहे. मी सुद्धा तेच राग त्याच क्रमाने गावून दाखवतो, नि रेसभर कमी गायलो तर बोगारवेसेत पुन्हा पाऊल म्हणून कसं ते टाकणार नाही. दारातला देवचांफा तुम्हाला दिसत नाही. परदेशचा टाकळा तेवढा दिसतो. काय न्याय आहे ! वाहवा!"

बुवांनी सर्वत्र दवंडी पिटली; बोर्ड लिहिले; ज्याला त्याला तोंडी सांगितलं की गणपतीच्या मंडपात मी, तो खांसाहेब गायला तेच राग गाऊन दाखवणार आहे; सर्वांनी यावे.

गणपतीचा मंडप पूर्ण भरून गेला. श्रोत्यांची रेटारेटी झाली. बुवा मध्ये जाजमावर तंबोरा घेऊन बसले. स्वरभरणा सुरू झाला. शुद्धकल्याण, मालकंस, सुरदासी मल्हार–सारं स्वरब्रम्ह हात जोडून उभं राहिलं. ताना, बोलतानांच्या लाटा उसळल्या. ग्वाल्हेरी गायकीत स्वतंत्र प्रज्ञेने ओतलेला रंग फेसाळून वर आला. सर्वांच्या श्रुति तृप्त झाल्या. तंबोरे उतरवून बवांनी बैठकीला विचारलं,

"मंडळी, उजवा कोण वाटला? हा बेळगावकरबुवा की तो पाव्हणा ?"

"निर्विवादपणे–तुम्हीच !"

हे शब्द ऐकल्यावरोबर बुवांनी पिशवीतून आणलेलं ताम्हण बाहर काढलं आणि बैठकीला सांगितलं,

"उत्तर बरोबर आहे. आता प्रत्येकाने ह्या ताम्हणात शक्तिप्रमाणे द्रव्य टाका. पै-पैसा, रुपया-पांच रुपये, मर्जीला येईल ते टाका".

मंडळीनी बुवांचा शब्द मानला. पंधरा मिनिटांत ताम्हण भरून गेलं. पैसे मोजून बुवा बैठकीला पुन्हा म्हणाले,

"मंडळी, एकूण रक्कम सहाशे एकाहत्तर रुपये नऊ आणे जमली आहे. गणपतीच्या मंडपात बसून मी देवाची सेवा केली. म्हणून ह्या रक्कमेपैकी फक्त सव्वा रुपया तेवढा माझी दक्षिणा म्हणून मी उचलतो— नि उरलेली सर्वच्या सर्व रक्कम ह्या देवाला देऊन टाकतो !"

सभा चकीत झाली. देवाच्या पेटीत पैसे टाकून निष्कांचन शिवरामबुवा, तंबोरा काखोटीला मारून डुलत डुलत, पोटभर अन्न मिळायचे वांदे असलेल्या आपल्या कफल्लक संसारात अनवाणी परतले.

* * *

अनुक्रमणिका






REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment JUNE

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4.




